# मुद्राज्योतिष

किंवा

# पटवर्धनी विद्या

लेखक

कै० "गणकभास्कर"

**विष्णु गोपाळ नवाथे**

संपादक, "कुंडलीविज्ञान"

आवृत्ति तिसरीः १९४७

निर्णयसागर प्रेस, मुंबई नं. २

किंमत १। रुपया

# प्रस्तावना

**आपुलीया बळें नाहीं बोलवत ।**
**सखा भगवंत वाचा त्याची ॥**

**—तुकाराम**

एकाद्या मनुष्याची कुंडली शारीरलक्षणांवरून मांडतां येणें शक्य आहे कीं नाहीं, यासंबंधानें कुंडलीविज्ञानाच्या पहिल्याच वर्षाच्या तिसऱ्या अंकांत दिग्दर्शन केलें होतें. त्यानंतर याच मासिक पुस्तकांत ठिकठिकाणीं लग्न, चंद्र व ग्रह यांचे आनुभविक आडाखे सांगितले. त्यावरून विचार करितां करितां माझ्या अनुमानास दिवसेंदिवस जास्त बळकटी येत चालली. हा लेख प्रसिद्ध केल्यानंतर चार वर्षांनीं (सन १९०५ मध्यें) पैठण येथील ग्रहविहारभुवनाचे चालक ज्योतिःकलादर्श भगवंत गोविंद तोडेवाले यांनीं याच विषयावर एक लहानसें पुस्तक प्रसिद्ध केलें. त्यांच्या मनांत आणखी दोन पुस्तकें लिहावयाचीं होतीं. त्यांच्या पहिल्या पुस्तकांत पंचांगासंबंधानें कांहीं आडाखे आहेत व अयन, पक्ष, मास आणि तिथि यांचें ज्ञान कसें करून घ्यावें याची माहिती आहे. लग्नाचे आडाखे त्यांच्या दुसऱ्या पुस्तकांत यावयाचे होते. परंतु आमच्या दुर्दैवानें तें पुस्तक अद्यापि प्रसिद्ध झालें नाहीं! आजकाल "मला चेहेऱ्यावरून कुंडली सांगतां येते" असें जाहीर करून आपल्या जादुविद्येनें लोकांस चकित करणारे ज्योतिषी आढळूं लागले आहेत. अशा वेळीं लोकांस या विद्येचें खरें स्वरूप दाखवून देणें अत्यंत आवश्यक आहे असें मनांत आल्यावरून ज्यो० तोडेवाले यांच्या दुसऱ्या पुस्तकाची वाट न पाहतां मीं जितकी माहिती आजपर्यंत मिळविली होती, तितकी सर्व एकत्र करून हें पुस्तक लिहिलें आहे.

केवळ शारीरलक्षणांवरूनच कुंडली मांडतां यावी अशी विद्या पूर्वीं हिंदुस्थानांत होती व हल्लींही क्वचित् एकाद्याजवळ असलेली दृष्टीस पडते. परंतु त्या विद्येवर कोणते ग्रंथ आहेत व ते कोणत्या भाषेंत असून कोठें आहेत याचा मला खात्रीलायक पत्ता मिळालेला नाहीं. तंजावर येथें **श्री. व्यंकोजी महाराज** यांच्या पुस्तकालयांत **शुक्रनाडी, बुधनाडी, गुरुनाडी,** वगैरे हस्तलिखित ग्रंथ बरेच असून ते अप्रतिम आहेत. त्याचप्रमाणें **सप्तर्षिवाक्यें** म्हणूनही एक ग्रंथ आहे. तो फारच मोठा असून त्यांत कुंडली मांडतां येण्याचीं

सामुद्रिक चिन्हें आहेत असें माझ्या एका मित्रानें मला कळविलें आहे. परंतु या ग्रंथांची प्रत्यक्ष माहिती नसल्यामुळें, ती होईपर्यंत योग्य तें मत आजच देतां येत नाहीं. तथापि असले कांहीं ग्रंथ पूर्वी झालेले असले पाहिजेत, इतकें मात्र निश्चयात्मक वाटतें, व त्यावरून ही कर्णपिशाच्चाची विद्या नाहीं अशी मनाला खात्री पटते. या विद्येचीं प्राचीन मूलतत्त्वें कै० बाबाजीराव पटवर्धन ऊर्फ महाडकर ज्योतिषी यांस थोडींबहुत तरी अवगत असलीं पाहिजेत असें त्यांच्या कर्तबगारीवरून वाटतें. त्यांच्यामागें या विषयांत त्यांच्याइतका प्रवीण दुसरा कोणी आढळत नाहीं. वय विचारून, जन्मनाम ( संध्येंतील नांव ) युक्तीनें काढून घेऊन व अयनपक्षादिकांची लटपट करून कुंडली मांडणारे मात्र अलीकडे कित्येक आढळूं लागले आहेत ! जर पृच्छकानें एकही उत्तर न देतां मौनव्रत स्वीकारलें, तर असल्या ज्योतिष्यांचें शेवटीं ॲफस् होतें असेंही ऐकण्यांत आहे ! ज्यो० भगवंत गोविंद तोडेवाले यांनीं शके १८२६ च्या भाद्रपद मासांत चेहेऱ्यावरून कुंडली सांगणारे कोठें असतील तर ते एकत्र प्रकट व्हावे, या बुद्धीनें श्रीमज्जगद्गुरु शंकराचार्य श्री विद्यानृसिंहभारती स्वामी यांच्या आश्रयाखालीं एक बक्षीससमारंभ करावयाचें ठरविलें होतें. त्याप्रमाणें पुणें येथें समारंभ झाला होता. त्यांत जमलेल्या उमेदवारांपैकीं शिरपूर येथील ज्यो० पंढरीनाथ हरी जोशी यांनीं दहांपैकीं एक कुंडली मांडल्याचें प्रसिद्ध झालें होतें. हे गृहस्थ कुंडलीविज्ञानाचे वर्गणीदार होते. एकंदर उमेदवार तीनच होते ! ज्यो० जोशी यांनीं केवळ शारीरलक्षणांवरूनच कुंडली मांडली होती. त्यांनीं आपणाजवळ **जातकपुष्प** नांवाचा ग्रंथ असल्याचें सांगितलें होतें. परंतु हाही ग्रंथ गुप्तच आहे, कारण तो प्रसिद्ध करण्याची त्यांची इच्छा नाहीं. असो. प्राचीन ग्रंथ तर बहुतेकांशीं नामशेषच आहेत व जे ऐकण्यांत येतात ते दुर्मिळ आहेत, म्हणून या विषयावर नवीन ग्रंथांची आवश्यकता आहे असें वाटून मीं हा एक अल्पसा प्रयत्न केला आहे. ज्यो० तोडेवाले आपल्या पहिल्या पुस्तकांत म्हणतात कीं, "ही विद्या प्रगट केल्यानें माझ्या धंद्याचें नुकसान होणार आहे !" कदाचित् याच कारणानें त्यांचीं पुढील पुस्तकें प्रसिद्ध झालीं नसावींत ! परंतु ही कृपणता मला मान्य नाहीं. कारण, विद्याधनाचा महिमा असा आहे कीं, तें जर आपण दिलें नाहीं तर कोणासही मिळावयाचें नाहीं, उलट दिल्यानें कमी न होतां दुप्पट होतें !

माझ्या मनांत हें पुस्तक यापेक्षांही विस्तृत करून आणखी कांहीं कालानें प्रसिद्ध करावयाचें होतें. तथापि देहाच्या क्षणभंगुरतेकडे लक्ष देऊन आज जितकें समजलें आहे तितकेंच प्रसिद्ध करावें, मग तें कितीही अल्प असो. या ज्ञानाच्या धोरणानें प्रयत्न करून दुसऱ्या एकाद्या कल्पकास या पायावर सुंदर इमारत बांधण्यास फारसे श्रम पडूं नयेत या बुद्धीनें हें पुस्तक आजच प्रसिद्ध करण्याची घाई केली. याबद्दल विद्वानांनीं क्षमा करावी अशी विज्ञप्ति करितों.

हें पुस्तक ज्यांस पंचांग चांगलें कळतें, लग्न व स्पष्ट ग्रह तयार करण्याची माहिती असून होरा-नवमांशादि कुंडल्या भरण्याचेंही ज्ञान आहे, आणि जातकफलादेशही थोडाबहुत कळतो अशा वाचकांसाठीं लिहिलेलें आहे. तथापि कोणीही मननपूर्वक वाचलें तरी बरेंच ज्ञान व्हावें अशी अटकळ आहे.

या पुस्तकांतील लक्षणें सायन अगर निरयन अशा कोणत्याही एका पद्धतीला धरून लिहिलेलीं नाहींत. राशि व ग्रह यांचीं जीं स्वाभाविक लक्षणें जातकशास्त्रांत सांगितलीं आहेत त्यांना धरूनच तीं लिहिलीं आहेत. त्यांचा अनुभव सायनानें चांगला येतो कीं निरयनानें चांगला येतो हें पाहण्याचें काम मी वाचकांवरच सोंपवितों.

हें पुस्तक आजच प्रसिद्ध होणें अशक्य होतें. परंतु येथील आमचे आश्रयदाते व मित्र श्रीयुत **आत्माराम शिवराम दिवाडकर** यांनीं योग्य मदत केली म्हणून लवकर प्रसिद्ध झाल्याचें श्रेय त्यांनाच आहे हें प्रांजलपणें कबूल करितों.

पृष्ठांच्या मानानें किंमत अधिक आहे असा आक्षेप कित्येकांकडून येण्याचा संभव आहे. परंतु हिऱ्याची किंमत जशी केवळ त्याच्या वजनावरच नसते, तशीच गुप्त विद्येच्या पुस्तकाची किंमत पृष्ठसंख्येवर ठेवतां येणार नाहीं. शिवाय हें पुस्तक दुर्बोध अशा शास्त्रीय विषयाचें असल्यामुळें ग्राहक थोडकेच मिळणार म्हणून किंमत अधिक ठेवण्याशिवाय गत्यंतर नाहीं, याबद्दल दिलगिरी वाटते !

या पुस्तकांत ज्या उणीवा किंवा चुका असतील, त्या कोणीं कळविल्यास दुसऱ्या आवृत्तीच्या वेळीं त्यांचा योग्य विचार होईल. शेवटीं, ज्या जगचालकाच्या प्रेरणेनें हें पुस्तक लिहिण्याची स्फूर्ति झाली त्या सर्वज्ञ परमात्म्यास ही कृति समर्पण करून ही वाढलेली प्रस्तावना पूर्ण करितों.

ग्रंथकर्ता

---

## आवृत्ति २ री

ईश्वरकृपेनें या पुस्तकाची ही दुसरी आवृत्ति निघाली आहे. या आवृत्तींत शेवटीं शके १८४८ पर्यंतचे ग्रह दिले आहेत. दुसरा फेरफार केला नाहीं. 'दैवी ज्योतिष' या सदराखालीं मला प्रत्यक्ष पाहण्यास मिळालेला ज्योतिषचमत्कार नमुन्यासाठीं दिला आहे. या पुस्तकाचा दुसरा भाग तयार होत आहे. अनुकूलता येतांच तो छापून होईल. या भागांत अनेक चेहेऱ्यांचे फोटो यावयाचे आहेत.

ग्रंथकर्ता

---

## तृतीयावृत्तीची प्रस्तावना

मुद्राज्योतिष हा विषय केवळ कर्णपिशाच्चादि मार्गांनींच साध्य होण्याजोगा आहे असें नाहीं. प्राचीन काळीं आपल्या देशांत केवळ शारीर लक्षणांच्या अवलोकनावरून जन्मलग्नकुंडली मांडतां येण्याच्या पद्धतीचे अनेक ग्रंथ निर्माण झाले होते. सध्यां ते सर्वांना सहज मिळण्याजोगे नाहींत, आणि ज्यांचेजवळ त्यांपैकीं कांहीं आहेत ते त्या ग्रंथांना गुप्त ठेवण्याचा प्रयत्न करीत असतात. तरी प्रयत्नशील ज्योतिष्यास त्या ग्रंथांच्या अभावींही मुद्राज्योतिष हा विषय अगदींच दुर्ज्ञेय राहील असें नाहीं; एवढेंच नव्हे तर त्यांत बरीच प्रगतीही करून घेतां येईल, याचें सुबोध वर्णन प्रस्तुत ग्रंथांत कै. नवाथे यांनीं मुक्तकंठानें केलें आहे.

या ग्रंथाची ही तिसरी आवृत्ति ग्रंथकर्त्यांनीं तयार केलेल्या द्वितीयावृत्ती-प्रमाणेंच ठेविली आहे. मात्र द्वितीयावृत्तींत शेवटीं शके १८४८ पर्यंतचेच मासिक स्पष्ट ग्रह होते, ते वाढवून शके १८७० अखेर पर्यंत पूर्ण केले आहेत. कारण प्रस्तुत ग्रंथांतील पद्धतीला हें स्पष्टग्रहांचें टिपण पूर्णपणें जवळ असणें आवश्यक आहे. शिवाय हा ग्रंथ जवळ ठेवल्यानें शके १७७१ पासून शके १८७० पर्यंत १०० वर्षांचे सूर्यादि स्पष्टग्रह संग्रहीं असल्याचा लाभ ज्योतिष्यांना सहजच होईल. कै. नवाथे यांनीं द्वितीयावृत्तीच्या प्रस्तावनेंत उल्लेख केल्याप्रमाणें या ग्रंथाचा दुसरा भाग सचित्र प्रसिद्ध होण्याचा संकल्प त्यांच्या-नंतर कोणी संशोधक पूर्ण करील तर महाराष्ट्रांतील ज्योतिषशास्त्रांत अमूल्य भर पडेल. तो सुदिन लवकरच उगवावा अशी ज्योतिश्चक्रचालक सूर्यनारायणाचे चरणीं प्रार्थना करून ही प्रस्तावना पूर्ण करितों.

आषाढ शुद्ध ११<br>शके १८६९

कृष्णाजी विठ्ठल सोमण

# विषयानुक्रम

# मुद्राज्योतिष

## लक्षण

कपाळ, मस्तक, नेत्र, कान, नाक, डोळे, मुख, दांत, जीभ, छाती, पोट, मांड्या, पंजे, पावलें व हातापायांचीं बोटें इत्यादि शारीरलक्षणांवरून जन्मकालची कुंडली तयार करण्याच्या विद्येस "मुद्राज्योतिष" असें नांव दिलें आहे.

कित्येक ज्योतिषी तळहाताच्या रेषांवरून कुंडली मांडतां येते असें म्हणतात, परंतु त्यांत तथ्य नाहीं. जर कोणी केवळ (मनुष्य न पाहतां) तळहाताच्या रेषांवरूनच कुंडली मांडणारा कोठें असेल, तर तो अत्यंत वंद्य पुरुष होय! अलीकडे कित्येक ग्रंथकारांनीं इंग्रजीमध्यें हस्तसामुद्रिकावर ग्रंथ लिहिले आहेत, पण त्यांचा कुंडल्या मांडण्याच्या कामीं तादृश उपयोग होत नाहीं. सारांश, तळहातावरील रेषांचा कुंडली तयार करण्याच्या कामीं विशेष उपयोग नाहीं.

## उत्पत्ति

मद्रास इलाख्यांत तेलगू, तामिळ वगैरे भाषांत लिहिलेले अप्रसिद्ध असे ताडपत्री ग्रंथ आहेत, त्यांत या विद्येचीं कांहींतरी मूलतत्त्वें असावीं असें वाटतें. कुंभकोण येथें "गोविंद चेटी" या नांवाचे त्रिकालज्ञ होते हें सुप्रसिद्ध आहे. हें ठिकाण मद्रास इलाख्यांतच आहे. तिकडील एकादा ब्राह्मण फिरत फिरत येऊन त्यानें कुंडली मांडून दिल्याचें कित्येकांच्या सांगण्यांत येतें. यावरून या विद्येचें उत्पत्तिस्थान मद्रास इलाखाच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

महाराष्ट्रांत ही विद्या उदयास आणणारे मूळ ज्योतिषी कै. वा. बाबाजीराव पटवर्धन ऊर्फ महाडकर ज्योतिषी हे होत. यांचा जन्म शके १७८७ वैशाख

कृ. १४ बुधवार या दिवशीं चिपळुणाजवळ पाचेरी सडा ऊर्फ मोभार येथें झाला. यांची जन्मकुंडली येणेंप्रमाणेंः—




( यांत गुरु, शुक्र व शनि हे वक्री आहेत )

कै. वा. शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनीं आपल्या भारतीय ज्योतिःशास्त्राच्या इतिहासांत खालीं लिहिल्याप्रमाणें म्हटलें आहे.

"सन १८८२ मध्यें बाबाजीरावांस एक द्रविड ब्राह्मण ज्योतिषी भेटला. तो विक्षिप्त होता. मनुष्याच्या शारीरलक्षणांवरून जन्मलग्न सांगण्याचीं कांहीं मूलतत्त्वें त्यानें पटवर्धनांस सांगितलीं. पुढें त्यांनीं स्वतः अनेक ग्रंथ पाहून त्यांतील लक्षणांची एकवाक्यता झाली तितकी करून व स्वतः शेंकडों मनुष्यें पाहून नियम बसवून आपलें ज्ञान वाढविलें."

"शारीरलक्षणांवरून जन्मलग्न आणि जन्मकाळीं अमुक ग्रह अमुक राशीस होता, एवढेंच हे सांगतात असें नाहीं; तर अमुक ग्रह अमुक राशीस अमुक अंशावर होता इतकें सांगतात. अंशांत फारतर सरासरी एक दोन अंशांची चूक पडते, असा अनुभव मीं पाहिला आहे. नेहमींच अंश सांगतात असें नाहीं, बहुधा नुसती राशि सांगतात."

हे महाड जिल्हा कुलाबा येथें कोर्टांत बेलीफ होते, त्यावरून यांस 'महाडकर ज्योतिषी' असें म्हणण्याचा पाठ पडला अहे. हात व जीभ पाहून हे लग्न, चंद्र व रवि बिनचूक सांगत. शकांत एकाद्या वर्षाची चूक पडे, याचें कारण गुरु एका राशीवर दोन्ही वर्षांत असतो.

## लोकभ्रम

हा चमत्कार पाहून सर्व लोक चकित झाले, व बाबाजीरावांस कोणीतरी देवता अगर एकादें पिशाच्च साध्य आहे असें म्हणूं लागले. याच्या पूर्वी अशा

प्रकारची एकादी विद्या असेल अशी महाराष्ट्रांत कोणाचीही कल्पना नव्हती. कुंडलीवरून शारीरलक्षणें सांगण्याचे ग्रंथांत कांहीं श्लोक आहेत, त्यांवरून व कांहीं अनुभवावरून अमुक कुंडलीचा मनुष्य अमुक प्रकारचा असावा असें सांगण्याचा ज्योतिष्यांचा रिवाज असे व अद्यापिही आहे. पण जर कुंडलीवरून शारीरलक्षणें सांगतां येतात, तर शारीरलक्षणांवरून कुंडली कां सांगतां येऊं नये, हें लोकांच्या ध्यानांत न आल्यामुळें बाबाजीरावांस कर्णपिशाच्चच अनुकूल असलें पाहिजे असा सर्वत्र भ्रम पसरला गेला, तो अद्यापिही कायम आहे.

## कर्णपिशाच्च नाहीं

पण अलीकडे हा भ्रम कमी होत चालला असून कित्येकांची तर खात्रीच झाली आहे कीं, हें कर्णपिशाच्च नाहीं. विशेषतः जे अलीकडील ज्योतिषी आहेत त्यांस तरी या विद्येस कर्णपिशाच्चाचें साह्य नको असें वाटूं लागलें आहे. ज्यांस ज्योतिषाचा गंध नाहीं व जे जुन्या मताचे जोशी आहेत त्यांस मात्र हें खरें वाटत नाहीं. ते म्हणतात, "जर हें कर्णपिशाच्च नाहीं, तर तुम्ही कुंडली मांडून दाखवा पाहूं ?" असल्या लोकांची खात्री प्रत्यक्ष पुराव्यावांचून होणें कठीण आहे. तथापि त्यांस कांहीं युक्तिवादाच्या गोष्टी तूर्त सांगण्यावांचून दुसरें साधन नाहीं.

## युक्तिवाद

१ ला.—कुंडलीवरून शारीरलक्षणें सांगणारे ज्योतिषी पुष्कळ असून ग्रंथांतही थोडेंबहुत विवेचन आहे.

२ रा.—बाबाजीरावांस एका द्रविड ब्राह्मणानें कांहीं लक्षणें सांगितलीं व त्यांनीं कांहीं अनुभवानें बसविलीं, अशी कै. शंकर बाळकृष्ण दीक्षित या प्रसिद्ध ज्योतिःशास्त्रवेत्त्याची साक्ष आहे.

३ रा.—बाबाजीरावांनीं एकादें साधन केलें अशाबद्दल पुरावा नाहीं.

४ था.—ग्रह व राशि यांचे परिणाम शरीरावर स्पष्ट दिसतात व त्यांवरून लग्न किंवा राशि यांचें ज्ञान होतें, असें या पुस्तकाच्या अध्ययनानें कळून येईल.

५ वा.—बाबाजीराव पटवर्धनी मानाचे ग्रह सांगत असत. पटवर्धनी पंचांग

हें प्राचीन नसून अगदीं अलीकडील काळांतलें आहे व कुंडल्या ग्रहलाघवी पंचांगानुसार असत.

## ईश्वरी देणगी

वरील युक्तिवादावरून सिद्ध होतें कीं, शारीरलक्षणांवरून कुंडली तयार करितां येण्यास देवता अगर कर्णपिशाच्च यांची आवश्यकता नाहीं. फक्त ईश्वरी देणगी ( बुद्धि ) पाहिजे. ही देणगी जशी ज्याच्याजवळ असेल, तसा तो पटाईत होईल.

## दिशा

ही विद्या कशी संपादन होईल याची दिशा समजली म्हणजे कल्पक, बुद्धिमान् व दीर्घोद्योगी मनुष्य कुंडली सहज मांडूं शकेल. बाबाजीरावांना थोडें तरी आयतें ज्ञान झालें होतें, त्यामुळें त्यांना अनुभवानें तें पुष्कळ वाढवितां आलें. परंतु आपणांस नवीन बसवावयाचें आहे, त्यासाठीं त्यांच्या शंभरपट यत्न केला पाहिजे. अभ्यासी मनुष्याला या पुस्तकाच्या वाचनानें दिशा कळेल व थोडेंबहुत ज्ञानही होईल अशी खात्री आहे. बाबाजीरावांनीं आपली विद्या कोणालाही दिली नाहीं किंवा ही कर्णपिशाच्याच्या साह्यावांचून साध्य नाहीं असेंही कोणाला सांगितल्याचें अगर प्रसिद्ध केल्याचें ऐकिवांत नाहीं, त्यामुळें नवीन विद्यार्थ्याला ती स्वतःच संपादन करावी लागणार आहे. निरुपाय आहे !

## साधनें

### पंचांगांचें संक्षिप्त टिपण

या विद्येचा अभ्यास करणाराजवळ पंचांगांचें एक संक्षिप्त टिपण असलें पाहिजे. कोणत्या शकांत व कोणत्या महिन्यांत ग्रह कोणत्या राशीला आहेत, हें बिनचूक समजण्यास हें साधन फार उपयोगी आहे. म्हणून तें शेवटीं शकवार दिलें आहे. त्यांत प्रत्येक महिन्याचे अमावास्येचे चंद्राशिवाय सर्व ग्रह दिले आहेत. चंद्र हा त्या दिवशीं रवीच्याच राशीला असतो, म्हणून तो दिला नाहीं. बाकीचे ग्रह अंशांसुद्धां दिले आहेत.

# पंचांगाच्या साह्यावांचून कोणत्याही वेळची कुंडली तयार करणें

कोणत्याही वेळची कुंडली पंचांगाच्या साह्यावांचून केवळ स्मरणशक्तीनें पूर्ण-पणें तयार करितां येणें कठीण आहे. कारण सर्व पंचांगें पाठ करण्याइतकी विशाल बुद्धि मनुष्यामध्यें असणें शक्य नाहीं. रवि, चंद्र, शनि, गुरु व राहु हे पांच ग्रह सामान्य बुद्धीचा मनुष्य कुंडलींत भरूं शकेल; पण मंगळ, बुध व शुक्र हे भरून देण्यास पंचांगांच्या संक्षिप्त टिपणाचीच आवश्यकता आहे. शारीरलक्ष-णांवरून कुंडली मांडणारानें या टिपणाचा उपयोग केला, तरी त्याच्या कर्तबगा-रीला बाध येईल असें वाटत नाहीं. टिपण न पाहतां बुध व शुक्र हे अजमासानें पुष्कळ अभ्यासांतीं मांडतां येण्यासारखे आहेत. कारण, ते रवीच्या आसपास दोन घरें मागें-पुढें असावयाचे असा नियम आहे. तरी ते नेमके मांडणें अश-क्यच आहे. मंगळ मात्र पाठ असेल तरच मांडतां येईल. आपणास जी पंचांगाच्या साह्यावांचून कुंडली मांडतां आली पाहिजे, तींत रवि, चंद्र, शनि, गुरु व राहु हे बिनचूक भरतां आले पाहिजेत. बुध, शुक्र व मंगळ हे भरतां आले नाहींत तरी हरकत नाहीं.

शनि, राहु व गुरु हे टिपणावरून बिनचूक पाठ करावे. रवि व चंद्र हे पाठ करण्याचें कारण नाहीं. रवि व चंद्र हे प्रत्येक महिन्याच्या अमावास्येस मेषादि राशींवर एकत्र असतात. चैत्रांत मेष, वैशाखांत वृषभ, ज्येष्ठांत मिथुन, आषाढांत कर्क, श्रावणांत सिंह, भाद्रपदांत कन्या, आश्विनांत तूळ, कार्तिकांत वृश्चिक, मार्गशीर्षांत धनु, पौषांत मकर, माघांत कुंभ व फाल्गुनांत मीन राशीवर अमावास्येला रवि व चंद्र एकत्र असावयाचेच. अधिक महिना असतां खऱ्या महिन्याचा जो राशि, त्याच्या मागील राशीवर अमावास्येला रविचंद्र एकत्र असतात. अमावास्या या शब्दाचा अर्थच असा आहे कीं, रवि व चंद्र यांचा एका राशींत योग. योगकालीं अमावास्या पूर्ण होते, व प्रतिपदेला सुरुवात होते. नंतर या दोन ग्रहांत १२ अंश ( डिग्री ) अंतर पूर्ण झालें कीं प्रतिपदा पूर्ण होते. याचप्रमाणें प्रत्येक १२ अंशांस एकेक तिथि पूर्ण होते असें समजावें. पौर्णिमेच्या दिवशीं रवि व चंद्र हे अगदीं समोरासमोर असतात; म्हणजे उभयतांत १८० अंश ( डिग्री ) अंतर असतें. याप्रमाणें तिथींची गणना असते. हें खालील कोष्ट-कावरून स्पष्ट समजेल.

| शुक्लपक्ष | कृष्णपक्ष |
|---|---|
| रवि ० अं. चंद्र = अमावास्या. | रवि १८० अं. चंद्र = पौर्णिमा. |
| रवि १२ अं. ,, = शु. प्रतिपदा. | रवि १९२ अं. ,, = कृ. प्रतिपदा. |
| रवि २४ अं. ,, = शु. द्वितीया. | रवि २०४ अं. ,, = कृ. द्वितीया. |
| रवि ३६ अं. ,, = शु. तृतीया. | रवि २१६ अं. ,, = कृ. तृतीया. |
| रवि ४८ अं. ,, = शु. चतुर्थी. | रवि २२८ अं. ,, = कृ. चतुर्थी. |
| रवि ६० अं. ,, = शु. पंचमी. | रवि २४० अं. ,, = कृ. पंचमी. |
| रवि ७२ अं. ,, = शु. षष्ठी. | रवि २५२ अं. ,, = कृ. षष्ठी. |
| रवि ८४ अं. ,, = शु. सप्तमी. | रवि २६४ अं. ,, = कृ. सप्तमी. |
| रवि ९६ अं. ,, = शु. अष्टमी. | रवि २७६ अं. ,, = कृ. अष्टमी. |
| रवि १०८ अं. ,, = शु. नवमी. | रवि २८८ अं. ,, = कृ. नवमी. |
| रवि १२० अं. ,, = शु. दशमी. | रवि ३०० अं. ,, = कृ. दशमी. |
| रवि १३२ अं. ,, = शु. एकादशी. | रवि ३१२ अं. ,, = कृ. एकादशी. |
| रवि १४४ अं. ,, = शु. द्वादशी. | रवि ३२४ अं. ,, = कृ. द्वादशी. |
| रवि १५६ अं. ,, = शु. त्रयोदशी. | रवि ३३६ अं. ,, = कृ. त्रयोदशी. |
| रवि १६८ अं. ,, = शु. चतुर्दशी. | रवि ३४८ अं. ,, = कृ. चतुर्दशी. |
| रवि १८० अं. ,, = पौर्णिमा. | रवि ० अं. ,, = अमावास्या. |

एका राशीचे अंश ३० होतात व एका नक्षत्राचे १३ अं. २० कला होतात. नक्षत्राच्या एका चरणाचे ( चवथ्या भागाचे ) ३ अं. २० क. होतात.

मेष—अश्विनी, भरणी, कृत्तिका च. १.

वृषभ—कृत्तिका च. ३, रोहिणी, मृग च. २.

मिथुन—मृग च. २, आर्द्रा, पुनर्वसु च. ३.

कर्क—पुनर्वसु च. १, पुष्य, आश्लेषा.

सिंह—मघा, पूर्वा, उत्तरा च. १.

कन्या—उत्तरा च. ३, हस्त, चित्रा च. २.

तुला—चित्रा च. २, स्वाती, विशाखा च. ३.

**वृश्चिक**—विशाखा च. १, अनुराधा, ज्येष्ठा.
**धनु**—मूळ, पूर्वाषाढा, उत्तराषाढा च. १.
**मकर**—उत्तराषाढा च. ३, श्रवण, धनिष्ठा च. २.
**कुंभ**—धनिष्ठा च. २, शततारका, पूर्वाभाद्रपदा च. ३.
**मीन**—पूर्वाभाद्रपदा च. १, उत्तराभाद्रपदा, रेवती.

च. म्हणजे चरण किंवा ४ था भाग. २। नक्षत्रांचा एकेक राशि होतो. चैत्राच्या अमावास्येला रवि मेष राशींत असावयाचा, म्हणजे तो अश्विनी, भरणी अगर कृत्तिकांचा १ ला चरण यांत असावयाचा. यावरून वैशाख शु. १ ला चंद्र भरणी अगर कृत्तिका या नक्षत्रांतच असेल. क्वचित् अश्विनीमध्येंही असेल. रवीचें मेषसंक्रमण चैत्र महिन्यांत जर अमावास्येच्या सुमाराला झालें असेल, तर वैशाख शु. प्रतिपदेला अश्विनी नक्षत्र असण्याचा संभव आहे. सर्वसाधारण वैशाख शु. प्रतिपदेला भरणी अगर कृत्तिकाच नक्षत्र असेल. याचप्रमाणें ज्येष्ठांत रोहिणी अगर मृग, आषाढांत आर्द्रा अगर पुनर्वसु, श्रावणांत पुष्य अगर आश्लेषा, भाद्रपदांत पूर्वा अगर उत्तरा, आश्विनांत हस्त अगर चित्रा, कार्तिकांत स्वाती अगर विशाखा, मार्गशीर्षांत अनुराधा अगर ज्येष्ठा, पौषांत पूर्वाषाढा अगर उत्तराषाढा, माघांत श्रवण अगर धनिष्ठा, फाल्गुनांत शततारका अगर पूर्वाभाद्रपदा व चैत्रांत उत्तराभाद्रपदा अगर रेवती याप्रमाणें शु. प्रतिपदेला नक्षत्रें असतील. यावरून एखाद्या महिन्यांतील वाटेल त्या तिथीचें नक्षत्र सुमारानें कळेल.

**उदाहरण**—शके १८१८ श्रावण व. ५ ला नक्षत्र कोण असेल? **उत्तरः**— श्रावणाच्या प्रतिपदेला पुष्य अगर आश्लेषा नक्षत्र असेल. म्हणून रोज एक नक्षत्र या हिशेबानें वद्य ५ ला विसावें नक्षत्र रेवती अगर अश्विनी असलें पाहिजे. या सालचें पंचांग काढून पहाल तर अश्विनी नक्षत्र आहे असें कळून येईल.

नक्षत्र कळलें म्हणजे राशि आपोआप कळेल. वरील उदाहरणांत अश्विनी नक्षत्र आलें म्हणून मेष राशि आहे असें आपणांस समजेल. याप्रमाणें चंद्र पंचांगाच्या साह्यावांचून कळेल.

वरील उदाहरणांत रवि कोणत्या राशीला आहे हें काढावयाचें आहे. आषाढांतल्या अमावास्येला तो कर्क राशीवर होता व श्रावणाच्या अमावास्येला तो

सिंह राशीवर असेल. म्हणून श्रावण वद्य ५ ला तो कर्क अगर सिंह राशीवर असेल इतकें आपणांस सहज कळेल. पंचमीचें चंद्रनक्षत्र अश्विनी आहे, म्हणून या दिवशीं रवि सिंह राशींतच असला पाहिजे असें सूक्ष्म विचारानें दिसून येईल. कारण अमावास्या मघा अगर पूर्वा नक्षत्रांतच व्हावयाची आहे.

रवीवरून इष्ट काळचें अजमासाचें लग्नही कळतें.




सुमारें ५।५ घटिकांनीं एकेक राशि उदयाच्या ठिकाणीं येतो. सूर्योदयाला सूर्य ज्या राशींत असेल तोच राशि उगवलेला असेल, म्हणून तेंच लग्न होईल. सुमारें ५ घटिकांनीं त्याच्या पुढील राशीचें लग्न असेल. या हिशेबानें वाटेल त्या काळचें लग्न समजेल.

याप्रमाणें पंचांगाच्या साह्यावांचून लग्न, चंद्र व रवि कुंडलींत भरून शनि, राहु व गुरु हे पाठ करून भरावे. ही माहिती जरी बरीच स्थूल ( ढोबळ ) आहे, तरी मुद्राज्योतिषाचा अभ्यास करणारांस ती पुरेशी आहे.

## कुंडलीवरून जन्मकालाचें ज्ञान

हें ज्ञान शनि, राहु, गुरु, रवि व चंद्र यांवरून होतें. शनि हा एका राशीवर सुमारें २॥ वर्षें असतो व त्याची बारा राशींत एक प्रदक्षिणा २९ वर्षें ५॥ महिने ( २९·४६ वर्षें ) झाल्यावर होते.

राहूची एक प्रदक्षिणा १८ वर्षांनीं होते व एका राशीवर तो सुमारें १॥ वर्षें असतो.

गुरूची एक प्रदक्षिणा ११ वर्षें १० महिन्यांनीं ( ११·८६ वर्षांनीं ) होते व प्रत्येक राशीवर तो सुमारें एक वर्ष असतो.

रवि हा प्रत्येक राशीवर ३०।३१ दिवस असतो, व बारा राशींत त्याची एक प्रदक्षिणा सुमारें ३६५। दिवसांत होते.

चंद्र प्रत्येक राशीवर सुमारें २। दिवस असतो व बारा राशींत त्याची एक प्रदक्षिणा सुमारें २७। दिवसांनीं होते.

दिवसाचा जन्म असतो तेव्हां रवि हा आकाशांत उगवलेला असतो. कुंडली हा आकाशाचा नकाशा आहे. म्हणून रवि जर उदित भागांत असला तर दिवसाचा जन्म आहे व अनुदित भागांत असला तर रात्रीचा जन्म आहे असें कुंडली पाहतांच दिसून येईल. खालील कुंडलींत 'उ' हें अक्षर उदित अर्ध दाखवितें व 'अ' हें अक्षर अनुदित (आपल्या पायांखालचें आकाश) अर्ध दाखवितें.




वरील कुंडलीवरून रवि जर 'उ' या अक्षराच्या स्थानीं असेल तर जन्म दिवसाचा आहे व 'अ' या अक्षराच्या ठिकाणीं असेल तर जन्म रात्रीचा आहे हें कुंडली पाहतांच कळेल.

वरील कुंडलींत आंकडे घातले आहेत ते स्थानांचा अनुक्रम दर्शवितात. त्यांत १ या आंकड्याच्या ठिकाणीं रवि असेल तर जन्म सूर्योदयाच्या सुमाराचा (सकाळचा) आहे असें समजेल. १० या आंकड्याजवळ रवि असतां जन्म मध्यान्हाच्या सुमाराचा आहे असें कळेल. ७ या आंकड्याजवळ रवि असतां जन्म दिवस मावळण्याच्या सुमाराचा आहे व ४ या आंकड्याजवळ रवि असतां जन्म मध्यरात्रीच्या सुमाराचा आहे असें कळेल. इतकें ज्ञान झालें म्हणजे इतरत्र रवि कोठेंही असतां जन्माच्या सुमाराच्या घटिका समजतील. बिनचूक जन्मकाल समजण्यास लग्न व रवि यांचे अंश समजले पाहिजेत, व स्पष्ट लग्न तयार करण्याची गणिताची माहिती असली पाहिजे.

रवि व चंद्र यांच्या मधील अंतरावरून पक्ष व सुमाराची तिथि कळेल. रवि व चंद्र यांचे अंश दिले असतील तर नक्की तिथि व नक्की नक्षत्रही कळेल. नुसत्या राशीवरून तीन तिथींच्या फरकानें तिथीचें ज्ञान होईल. कुंडलींत रवि व चंद्र हे एकाच राशीवर असतील तर अमावास्येच्या सुमाराचा जन्म आहे असें समजेल, म्हणजे वद्य १४।३० अगर शुद्ध १ चा जन्म आहे इतकें ज्ञान होईल. रवीपासून ७ व्या ठिकाणीं चंद्र असेल तर पौर्णिमेच्या सुमाराचा जन्म आहे असें कळेल. रवीपासून ४ थ्या ठिकाणीं चंद्र असेल तर शुद्ध अष्टमीच्या सुमाराचा व रवीपासून १० व्या ठिकाणीं चंद्र असेल तर वद्य अष्टमीच्या सुमाराचा जन्म सांगतां येईल. मधल्या तिथि २।। दिवसांस एक राशि या हिशेबानें सुमाराच्या कळतील. याप्रमाणें पक्ष व तिथि यांचें ज्ञान होईल.

रवीवरून महिना सांगावा. ज्या राशींत रवि असेल त्या राशीवरील अमावास्या होऊन गेली असेल तर पुढील महिना सांगावा, व व्हावयाची असेल तर तोच महिना सांगावा. रवि प्रत्येक महिन्याच्या अमावास्येस कोणत्या राशीवर असतो हें मागें सांगितलें आहे, त्याचा उपयोग करावा.

आज शनि, राहु व गुरु हे कोणत्या राशीवर आहेत हें पंचांगावरून काढून, नंतर कुंडलींतल्या राशीवर प्रत्येक जण येण्यास मागें किती काळ गेला पाहिजे तो प्रत्येकाचा निरनिराळा काढावा; व सर्वांचा मेळ ज्या काळांत बसतो तो काळ वर्तमान शकांत वजा करावा म्हणजे जन्माचा शक कळेल.

कुंडली जर शके १७७१ ते १८७० पर्यंतची असेल तर शनि, राहु व गुरु हे पाठ केल्यामुळें ती खटपटीशिवाय कळेल. फार प्राचीन असेल तर वरील हिशेबानें जाणली पाहिजे.

## अंधकुंडली

हाही अभ्यास मोठ्या गंमतीचा आहे. कुंडलींत नुसते ग्रह मांडलेले असले तर तिला अंधकुंडली म्हणतात. या कुंडलींत राशि भरण्याचें मोठें कसब आहे. ज्या मनुष्याची ही अंधकुंडली असेल तो मनुष्य जर आपल्या नजरेसमोर असेल, तर त्याच्या जन्मशकाचें ढोबळ ज्ञान होतें व त्यावरून शनीचा राशि चटकन

कळतो. शनीचा राशि कळला कीं, बाकीचे राशि एकापुढें एक मांडीत जावयाचे एवढेंच कर्तव्य राहतें. उदाहरणार्थ खालील कुंडली पहाः—




वरील कुंडलीचा मनुष्य जर आपणासमोर असेल तर त्याच्या सुमाराच्या वयावरून आपणांस दिसून येईल कीं, शनि मिथुन राशीचा आहे व त्याचा जन्मशक १७७८ आहे. शनीच्या ठिकाणीं ३ चा आंकडा प्रथम मांडून नंतर बाकीचे अंक स्थानांच्या अनुक्रमानें भरीत गेलें म्हणजे मंगळाजवळ ६, केतूजवळ ७, गुरूजवळ १२, राहु, रवि व शुक्र यांच्याजवळ १ व बुध आणि चंद्र यांच्याजवळ २ असे राशींचे अंक येतील.

मनुष्य जर समोर नसेल तर मात्र राशींचे अंक भरणें अति कौशल्याचें व धोरणाचें काम आहे. हें पुस्तक जवळ असेल व जन्मशक १७७१ पर्यंत असेल तर त्यावरून राशींचे अंक भरतां येतील. पण यापासून लोकांस कौतुक वाटावयाचें नाहीं, व त्यांत आपलाही पुरुषार्थ नाहीं. अंधकुंडली केव्हांचीही असो, ती जर मनुष्य न पाहतां भरतां आली तरच त्या विद्येला किंमत आहे. यासाठीं ती कशी भरावी याचा खुलासा करितों.

प्रथमतः आपणांस पंचांगावरून शनिगुरु, शनिराहु व गुरुराहु अशा जोड्या एकत्र, समोरासमोर व चतुर्थदशम केव्हां केव्हां होत्या व त्यांचे असे योग केव्हां केव्हां होतात, यांचें एक टिपण केलें पाहिजे व तें चांगलें पाठ केलें पाहिजे. म्हणजे त्या टिपणाच्या आधारानें हें काम फार जलद होईल. वरील कुंडलीवरून आपणांस असें दिसून येईल कीं, गुरु हा शनीशीं योग करूं लागण्यास सुमारें ४।५ वर्षांचा अवकाश आहे. शके १७८२।८३ मध्यें प्रथमतः शनि व गुरु हे एका राशीवर होते. अर्थात् त्यापूर्वी ४।५ वर्षांचा काल म्हणजे

१७७८।७९ येतो. त्याचप्रमाणें राहु व गुरु यांचा योग होण्याचा समय प्राप्त झाला आहे. कारण राहूचें भ्रमण उलटें होत असल्यामुळें तें गुरूकडे होत आहे व गुरु राहूकडे चालला आहे. या उभयतांची गांठ एका वर्षांत पडणार, म्हणून शके १७७८ सालचीच ही कुंडली आहे हें निश्चित आहे.

अंधकुंडलीचें ज्ञान होण्यासाठीं शेवटीं कोष्टक नं. १ दिलें आहे, तें पहावें.

## अवलोकन

या विद्येचा अभ्यास करणारानें चेहरा वगैरे शारीरलक्षणांचें अवलोकन सतत केलें पाहिजे. किंबहुना अवलोकन हेंच या विद्येचें प्रधान अंग आहे. लक्षणें माहीत असलीं तरी अवलोकन जर नसेल तर कुंडली कधींही मांडतां येणार नाहीं. कारण मनुष्याचें तेज, बोलण्याचालण्याची त्याची ढब, वयपरत्वें शरीरांत होणारा बदल वगैरे गोष्टी अवलोकनशक्तीनेंच समजणाऱ्या आहेत. म्हणून प्रथम अवलोकनशक्ति वाढविण्याचा अभ्यास करावा.

## वयाचें ज्ञान

अवलोकनशक्तीनें मनुष्याच्या वयाचें ज्ञान होईल. हें ज्ञान बिनचूक झालें पाहिजे. त्याच्या योगानें जन्माचा शक कळतो, व शक कळला कीं गुरु, शनि व राहु हे तीन ग्रह कोणत्या राशींवर आहेत तें सांगतां येतें. म्हणून वयाचें ज्ञान होणें अत्यावश्यक आहे. जर बिनचूक वय कळलें तर उत्तमच. नाहींपेक्षां निदान ५ वर्षांच्या फरकानें तरी कळलें पाहिजे. कारण शनि एका राशीवर २॥ वर्षे सुमारानें असतो. म्हणून तो दोन राशींवर कळेल, व राहु एका राशीवर १॥ वर्षे असतो म्हणून तो तीन राशींवर कळेल. नंतर शरीराची ठेवण, हावभाव, स्वर वगैरेंवरून शनीची प्रथम एकच राशि कायम करावी. मग राहूची व शेवटीं गुरूची राशि कायम करावी.

## लग्न व चंद्र यांचें ज्ञान

शरीराची ठेवण व चेहरा यांचा लग्न व चंद्र यांच्याशीं मुख्यत्वें संबंध आहे. शरीराची ठेवण चंद्राप्रमाणें व चेहऱ्याची आकृति लग्नाप्रमाणें असा सर्वसाधारण अनुभव आहे. कित्येक वेळां याच्या उलटा अनुभवही येतो. त्यामुळें लग्न अमुक व चंद्र अमुक असें निश्चयात्मक सांगणें कठीण जातें. तथापि ज्यानें आपली

अवलोकनशक्ति व शारीरलक्षणांची माहिती पुष्कळ वाढविलेली असेल तो अचूक उत्तर दिल्याशिवाय राहणार नाहीं.

लग्नांत ज्या वेळीं ग्रह असतात किंवा चंद्र हा एकाद्या ग्रहानें युक्त असतो, त्या वेळीं राशींचीं स्वाभाविक लक्षणें लोपून ग्रहांचीं लक्षणें उमटलेलीं असतात. अशा वेळीं लग्नचंद्रांचें ज्ञान होणें कठीण असतें.

स्वर, बोलण्याची तऱ्हा, बसण्याची ऐट, चालण्याची ढब, हावभाव, हंसण्याचा प्रकार, मुद्रा, नेत्रांचें पाणी, केंस आणि पोषाख, यांचाही विचार केला पाहिजे. लक्षणसमुच्चयानें हें सर्व ज्ञान होतें यांत शंका नाहीं. हें ज्ञान लिहून दाखवितां येण्यासारखें नाहीं, तें अनुभवानेंच मिळविलें पाहिजे.

## चेहऱ्यांचें सादृश्य

जुळीं मुलें एकाच काळीं जर झालीं असलीं (म्हणजे त्यांच्यांत फार कालाचें अंतर नसलें) तर त्यांचे चेहरे एकसारखेच कां असावे? एकाच आईबापांचीं सर्व मुलें पाहिलीं तर त्यांच्या चेहऱ्यांत जुळ्या मुलांसारखें सादृश्य कां असत नाहीं? या गोष्टींचा विचार केला म्हणजे राशींचा अंमल शरीरावर असतो कीं नाहीं या नास्तिकांच्या प्रश्नाचा सहज उलगडा होतो. जुळीं मुलें एकाच लग्नावर उपजतात त्यामुळें त्यांचे चेहरे सारखे असतात व त्यांचा चंद्र एकाच राशींत असतो म्हणून शरीरांची ठेवणही सारखी असते. भावंडेंसुद्धां जीं एकाच लग्नावर जन्म पावतात किंवा ज्यांचा चंद्र एकच असतो तीं सारखींच दिसतात. जीं तशीं नसतात त्यांच्या लग्न-चंद्रांतही साम्य नसतें हा अनुभव प्रत्येकाला घरांतल्या घरांतसुद्धां घेतां येण्यासारखा आहे. मूल जर आईच्या वळणाचें दिसलें तर तें आईच्याच लग्नावर निश्चयानें उपजलेलें असलें पाहिजे, किंवा आईची आणि त्याची राशि (चंद्र) एकच असली पाहिजे, किंवा मुलाची राशि तें आईचें लग्न व आईची राशि तें मुलाचें लग्न असें साम्य असलेंच पाहिजे. वळणांत जितकें जास्त सादृश्य तितकेंच लग्न व चंद्र यांत जास्त सादृश्य असेल. याचप्रमाणें मूल बापाच्या वळणाचें असेल तर त्याच्या लग्न-चंद्रांत वरीलप्रमाणेंच साम्य असतें.*

---

* सायन पद्धति खरी कीं निरयनपद्धति खरी याचा उलगडा येथें खासा होतो. कल्पना करा कीं, मूल बापाच्या वळणाचें असून बापाचें लग्न तुला व मुलाचें कन्या आहे असें निरयनपद्धतीची कुंडली दर्शवील तर छातीला हात लावून असें निश्च-

हा एकच अनुभव घेतला म्हणजे शारीरलक्षणांवरून कुंडली मांडतां येण्यास कर्णपिशाच्चाची जरूर आहे, कीं एकाद्या हडळीची जरूर आहे, कीं केवळ ज्योतिषी दृष्टीचीच जरूर आहे हें प्रत्येकाला कळून येईल. कोणतीही विद्या उडाणटप्पूपणानें साध्य होणें कठीण आहे. तिच्यावर फार दिवस परिश्रम करावे लागतात, तेव्हांच तिचा एकादा अस्सल कण हातीं आला तर येत असतो. एल्. एम्. ॲण्ड एस्. झाल्यावरही धंद्यांत प्रावीण्य संपादन करण्यास ४।५ वर्षे घालवावीं लागतात व डाक्टरीची परीक्षा देण्यास पूर्वी निदान १२ वर्षे तरी घालावीं लागलीं होतीं, याप्रमाणें एकंदर १६।१७ वर्षे जेव्हां परिश्रम झाले, तेव्हां कोठें उत्तम डॉक्टर असें लोक म्हणूं लागले. हें जर खरें आहे, तर ज्योतिषशास्त्रानेंच असें काय घोडें मारलें आहे, कीं तें आपलें चुटकीसरसें आलें पाहिजे! असो. यावरून ध्यानांत येईल कीं, जर आपणांस या विद्येंत प्रावीण्य संपादन करावयाचें असेल तर या पुस्तकांत प्रतिपादन केलेला सर्व अभ्यास यथासांग केला पाहिजे. इतका अभ्यास करा व मग पाहिजे तर या मार्गाला दूषणें द्या.

या विद्येचा अभ्यास करणाराजवळ एक टिपणपत्रक (नोटबुक) असलें पाहिजे. त्यांत त्यानें एका चेहऱ्यासारखे चेहरे ज्यांचे ज्यांचे आढळतील

---

यानें सांगतां येतें कीं, बापाचें सायन लग्न तुलाच असलें पाहिजे व मुलाचेंही सायनानें तुला आलें पाहिजे; अथवा बापाचा चंद्र मिथुन असून मुलाचा वृषभ आहे असें निरयन कुंडलींत दिसेल तर बापाचा चंद्र सायन मिथुनेंतच असून मुलाचाही सायनानें मिथुनेंत आला पाहिजे. फलज्योतिष सायन आहे कीं निरयन आहे हा वाद येथें प्रत्यक्ष पुराव्यानें सिद्ध होतो. निरयन पद्धति खोटी आणि भ्रामक आहे. समाजांत तिनें आपला जरी पगडा बसविलेला असला, तरी सायनसूर्याचा आतां उदय झाल्यामुळें तिला हिंदुस्थानांतून लवकरच पळ काढल्याशिवाय गत्यंतर नाहीं असें खात्रीनें वाटतें. सायनपद्धति ही आमचीच आहे, ती परकी लोकांपासून उचललेली नाहीं, उलट त्यांनींच आमची उचलली आहे. वेद, महाभारत व इतर पुराणें, प्राचीन ज्योतिष ग्रंथ, या सर्वांत सायनाचें अस्तित्व आहे. शके ४४४ मध्यें संपात जेव्हां रेवतींत आला, तेव्हां नक्षत्रांच्या भ्रमणानें निरयन पद्धतीचा जन्म झाला आहे. मनुष्य कितीही विद्वान् झाला तरी त्याला रूढीच्या विरुद्ध 'ब्र' काढतां येत नाहीं, म्हणून भास्कराचार्यांसारख्या ज्ञानी पुरुषाला समजलें असूनही प्रतिपादन करितां आलें नाहीं. हें आमचें दुर्दैव होय!

त्यांच्या त्यांच्या कुंडल्या नांवांसह टिपून ठेवाव्या व त्या दोन माणसांचें नावें, जन्मांचीं ठिकाणें व जन्मांच्या वेळा यांचेंही टिपण ठेवावें. होतां होईल तों हा क्रम ओळखीच्या माणसांचाच असावा, म्हणजे या टिपणावरून जेव्हां जेव्हां त्यांच्या लक्षणाचा मनुष्य आढळेल तेव्हां तेव्हां त्या मनुष्याची कुंडली सहज सांगतां येईल.

## कुंडल्यांवरून मनुष्य ओळखणें

अनेक माणसांच्या कुंडल्या एका कागदावर दुसऱ्याकडून टिपून घेऊन तीं माणसें एका रांगेंत बसवावीं व नंतर अमुक मनुष्याची अमुक कुंडली असली पाहिजे असें सांगावें. हा अभ्यास फारच गंमतीदार आहे. शारीरलक्षणांवरून कुंडली मांडण्याच्या कामीं याचा अत्यंत उपयोग आहे. हा अभ्यास करणारानें प्रथम वयाचा अजमास चेहऱ्यावरून करावा; व प्रत्येक मनुष्याचे शनि, गुरु आणि राहु हे तीन ग्रह कोणकोणत्या राशीवर असले पाहिजेत हें आपल्या मनाशीं कायम करावें. हा विचार कायम झाला म्हणजे नंतर तें टिपण पुढें घ्यावें, व त्यावरून प्रत्येकाची कुंडली निवडून द्यावी. कुंडल्यांवरून वय तयार करून नंतर त्या त्या वयाचीं मनुष्यें ओळखणें हा गौण मार्ग आहे, या मार्गानें इष्ट कार्य साधण्यास फार विलंब लागेल, किंबहुना साधणारही नाहीं. म्हणून चेहऱ्यावरून वय ओळखावें व वयावरून कुंडली ओळखावी, यांतच कौशल्य अधिक आहे.

आपलें इष्ट साध्य होण्यासाठीं सारख्या वयाचीं मनुष्यें निवडून घेतलीं पाहिजेत. अगदीं एकाच शकांतलीं असलीं तर फारच उत्तम. निरनिराळ्या वयाचीं मनुष्यें पाहणें हा अधम पक्ष होय, जवळ जवळच्या वयाचीं पाहणें हा मध्यम पक्ष होय व एकाच शकांतलीं पाहणें हा उत्तम पक्ष होय, असें जरी आहे, तरी अभ्यासी मनुष्यानें कनिष्ठ पक्षापासूनच प्रयत्न करावा. एकदम उत्तम पक्षाला हात घालूं नये. पायरीपायरीनें प्रयत्न करावा व एका गोष्टींत प्रावीण्य मिळाल्यावर दुसरी गोष्ट हातीं घ्यावी. एकाच शकांतलीं मनुष्यें ओळखून काढण्यास लग्न-चंद्रांचें ज्ञान व्हावें लागतें. हें ज्ञान अभ्यासानें येईल व नंतर शारीरलक्षणांवरून कुंडली जलद मांडतां येऊं लागेल. अखेर धारणेनेंच जरी समाधि लागावयाची असली, तरी योगाभ्यासी मनुष्याला यमनियमासनादि विधींनींच यथानुक्रम अभ्यास करावा लागतो, हाच प्रकार येथेंही आहे.

एकाच शकांतलीं व एकाच लग्नाचीं मनुष्यें ओळखणें हा उत्तमोत्तम पक्ष आहे व लग्न आणि चंद्र एकाच राशींत असलेलीं माणसें ओळखणें हा त्याच्याहीपेक्षां श्रेष्ठ प्रयत्न आहे. अशा पायरीपायरीनें प्रयत्न करून अवलोकनशक्ति मनुष्य जशी जशी वाढवील, तसा तसा तो शारीरलक्षणांवरून कुंडली मांडण्याच्या कामांत पटाईत होत जाईल. हें तत्त्व ज्यानें सोडिलें तो या विषेंत कधींही तरबेज होणार नाहीं.

## ग्रहांचे स्वाभाविक धर्म

ग्रह हे कुंडलींत कोठेंही असले तरी ते ज्या राशींत व ज्या स्थानांत असतील, त्या राशींच्या व स्थानांच्या अनुरोधानें शरीरावर परिणाम करितात. शिवाय ते एकाद्या ग्रहाशीं युतियोग, त्रिकोणयोग, केंद्रयोग, प्रतियोग वगैरे योग करितील त्याप्रमाणें ते विशेष प्रकारचें फल देणारे होतात. यासाठीं ज्योतिःशास्त्राची पुष्कळ माहिती असल्याशिवाय हे ग्रहांचे परिणाम कळणार नाहींत. या पुस्तकांत ग्रह व राशि यांचे फक्त स्वाभाविक धर्म सांगावयाचे आहेत. यापेक्षां जास्त माहिती देणें शक्य नाहीं. ती ज्याची त्यानें स्वतः संपादन करावी.

**रविः—**

मधुपिङ्गलदृक्सूर्यश्चतुरस्रतनुः शुचिः ।
पित्तप्रकृतिको धीमान्पुमानल्पकचो द्विजः ॥

मधाच्या रंगासारखी पिंगट अशी दृष्टि ( नेत्र ), चौकोनी आकाराचें शरीर, पित्तप्रकृति, बुद्धिमान् व ज्याला केश अल्प असें सूर्याचें लक्षण आहे. या ग्रहाचा वर्ण रक्तश्याम ( तांबुसकाळा ) असा असून तो सत्त्वगुणी, अग्नितत्त्वाचा, ज्याची देवता अग्नि, मनुष्याच्या अस्थीशीं ज्याचा संबंध, पुरुषसंज्ञक, क्षत्रिय वर्णाचा असा हा पापग्रह आहे.

**चंद्रः—**

बहुवातकफः प्राज्ञश्चन्द्रो वृत्ततनुर्द्विजः ।
शुभदृक् मृदुवाक्यश्च चञ्चलो मदनातुरः ॥

वातकफात्मक प्रकृतीचा, ज्याचा देह गोंडस, लहानसर गोलाकार अवयव, स्वच्छ ( शुभ्र ) दृष्टीचा, मृदु बोलणारा, चंचल व अत्यंत विषयी असें चंद्राचें लक्षण आहे. वर्ण गोरा, सत्त्वगुणी, जलतत्त्वाचा, ज्याची देवता जल, मनुष्याच्या रक्ताशीं ज्याचा संबंध, स्त्रीसंज्ञक व वैश्य वर्णाचा असा हा शुभ ग्रह आहे.

मंगळः—

क्रूररक्तारुणो भौमश्चपलोदारमूर्तिकः ।
पित्तप्रकृतिकः क्रोधी कृशमध्यतनुर्द्विजः ॥

दृष्टि क्रूर, अरुणाच्या वर्णाचा ( लाल ), चपळ, उदार, पित्तप्रकृतीचा, रागीट व शरीराचा मध्यभाग कृश असें मंगळाचें लक्षण आहे. हा तांबुसगोरा, तमोगुणी, अग्नितत्त्वाचा, मज्जेशीं ज्याचा संबंध, पुरुषसंज्ञक व क्षत्रियवर्णाचा असा पापग्रह आहे.

बुधः—

वपुः श्रेष्ठः श्लिष्टवाक्च सदा हास्यरुचिर्बुधः ।
पित्तवान्कफवान् वैश्यो मारुतप्रकृतिस्तथा ॥

सुंदर शरीर, श्लेषयुक्त भाषण, नेहमीं हंसरा, ज्या ग्रहाशीं संबंध करील त्याच्या स्वभावानुसार प्रकृतीचा, वात-पित्त-कफयुक्त, असा हा ग्रह आहे. हा हिरवट व काळसर रंगाचा, रजोगुणी, भूतत्त्वाचा, नपुंसक, त्वचेशीं ज्याचा संबंध व वैश्यवर्णाचा असा शुभग्रह आहे.

गुरुः—

बृहद्गात्रो गुरुश्चैव पिङ्गलो मूर्धजेक्षणः ।
कफप्रकृतिको धीमान् सर्वशास्त्रविशारदः ॥

शरीर स्थूल, केश व दृष्टि पिंगट, कफप्रकृतीचा, बुद्धिमान् व सर्व शास्त्रें जाणणारा असें गुरूचें लक्षण आहे. हा गोरा, सत्त्वगुणी, आकाशतत्त्वाचा, मेदाशीं ज्याचा संबंध, पुरुषसंज्ञक व विप्रवर्णाचा असा शुभग्रह आहे.

शुक्रः—

सुखी कान्तवपुः श्रेष्ठः सुनेत्रश्च भृगोः सुतः ।
काव्यकर्ता कफाधिक्यानिलात्मा वक्रमूर्धजः ॥

सुखी, सुंदर व कांतिमान् असें शरीर, नेत्र पाणीदार, काव्यकर्ता, कफाधिक्य अशा वातप्रकृतीचा व काळ्या कुरळ केशांचा असें शुक्राचें लक्षण आहे. हा चित्रविचित्र वर्णाचा, रजोगुणी, जलतत्त्वाचा, स्त्रीसंज्ञक, रेताशीं ज्याचा संबंध व विप्रवर्णाचा असा शुभग्रह आहे.

शनिः—

कृशदीर्घतनुः सौरिः पिङ्गदृष्ट्यनिलात्मकः ।
मन्दोऽलसः स्थूलदन्तः खररोमकचस्तथा ॥

सडपातळ व उंच शरीर, दृष्टि पिंगट, वातप्रकृति, मंद, आळशी, दांत मोठे, केश व अंगावरील लव जास्त व रांठ हें शनीचें लक्षण आहे. हा कृष्णवर्ण, तमोगुणी, वायुतत्त्वाचा, नपुंसक, शिरांशीं ज्याचा संबंध आणि अंत्यजवर्णाचा असा पापग्रह आहे.

राहु व केतुः—

धूम्राकारो नीलतनुर्वनस्थोऽपि भयङ्करः ।
वातप्रकृतिको धीमान् स्वर्भानुः प्रतिमः शिखी ॥

आकाशाच्या किंवा धुरकट वर्णाचा, वनांत राहणारा (जंगली), वातप्रकृतीचा व बुद्धिमान् असें राहू व केतु यांचें लक्षण आहे.

## राशींचे स्वाभाविक धर्म

**मेष**—या राशीचा अंमल मस्तकावर आहे. आकृति मेंढ्यासारखी असून संचार अरण्यांत, याचा स्वामी मंगळ, पाठीकडून उदय पावणारा, क्रूर, पुरुषजातीचा, चर स्वभावाचा, ऱ्हस्वदेही व तांबड्या वर्णाचा असा हा राशि आहे.

**वृषभ**—या राशीचा अंमल मुखावर आहे. स्वरूप बैलाप्रमाणें असून संचार अरण्यांत, याचा स्वामी शुक्र, पाठीकडून उदय पावणारा, सौम्य, स्त्रीजातीचा, स्थिर स्वभावाचा, ऱ्हस्वदेही व पांढऱ्या वर्णाचा असा हा राशि आहे.

**मिथुन**—या राशीचा अंमल वक्षःस्थलावर आहे. आकृति जोडप्याची असून पुरुषाच्या हातांत गदा व स्त्रीच्या हातांत वीणा आहे, संचार ग्रामांत, याचा स्वामी बुध, मस्तकाकडून उदय पावणारा, क्रूर, पुरुषजातीचा, चर व स्थिर असा द्विस्वभावाचा, समानदेही व हिरवट रंगाचा असा हा राशि आहे.

**कर्क**—या राशीचा अंमल हृदयावर आहे. आकृति खेंकड्यासारखी असून संचार पाण्यांत, याचा स्वामी चंद्र, पाठीकडून उदय पावणारा, सौम्य, स्त्रीजातीचा, चर स्वभावाचा व समानदेही असा हा राशि आहे.

**सिंह**—या राशीचा अंमल उदरावर आहे. आकृति सिंहासारखी असून संचार अरण्यांत, याचा स्वामी रवि, मस्तकाकडून उदय पावणारा, क्रूर, पुरुषजातीचा, स्थिर स्वभावाचा, दीर्घदेही व धूम्रवर्णाचा असा हा राशि आहे.

**कन्या**—या राशीचा अंमल कटिप्रदेशावर आहे. आकृति धान्य व अग्नि घेऊन नौकेंत बसलेली स्त्री अशी असून संचार नौकेंत, याचा स्वामी बुध, मस्तकाकडून उदय पावणारा, सौम्य, स्त्रीजातीचा, चर व स्थिर असा द्विस्वभावाचा, दीर्घदेही व अनेक वर्णांचा असा हा राशि आहे.

**तुला**—या राशीचा अंमल बस्तिभागावर ( ओटीपोटावर ) आहे. आकृति हातांत ताजवा धरलेला पुरुष अशी असून संचार बाजारांत, याचा स्वामी शुक्र, मस्तकाकडून उदय पावणारा, काळ्या वर्णाचा, क्रूर, पुरुषजातीचा, चर स्वभावाचा व दीर्घदेही असा हा राशि आहे.

**वृश्चिक**—या राशीचा अंमल गुह्येंद्रियांवर आहे. आकृति विंचवासारखी असून संचार गुहा, उकीरडे, विषारी प्राण्यांचीं बिळें, वारुळें वगैरे प्रदेशांत आहे. याचा स्वामी मंगळ, मस्तकाकडून उदय पावणारा, सौम्य, स्त्रीजातीचा, स्थिर स्वभावाचा, दीर्घदेही व पिंवळ्या वर्णाचा असा हा राशि आहे.

**धनु**—या राशीचा अंमल मांड्यांवर आहे. आकृति पूर्वार्धीं धनुर्धारी पुरुष व उत्तरार्धीं अश्वजघन अशी असून संचार गांवांत, याचा स्वामी गुरु, पाठीकडून उदय पावणारा, क्रूर, पुरुषजातीचा, चर व स्थिर असा द्विस्वभावाचा, समानदेही व पिंगट वर्णाचा असा हा राशि आहे.

**मकर**—या राशीचा अंमल गुडघ्यावर आहे. आकृति पूर्वार्धीं मृगमुख व उत्तरार्धीं जलचर अशी असून संचार पूर्वार्धीं अरण्यांत व उत्तरार्धीं पाण्यांत, याचा स्वामी शनि, पाठीकडून उदय पावणारा, सौम्य, स्त्रीजातीचा, चर स्वभावाचा, समानदेही व करड्या रंगाचा असा हा राशि आहे.

**कुंभ**—या राशीचा अंमल पोटऱ्यांवर आहे. आकृति घटधारी पुरुष अशी असून संचार गांवांत, याचा स्वामी शनि, मस्तकाकडून उदय पावणारा, क्रूर, पुरुषजातीचा, स्थिर स्वभावाचा, ऱ्हस्वदेही व मुंगुसाच्या वर्णाचा असा हा राशि आहे.

**मीन**—या राशीचा अंमल पावलांवर आहे. आकृति उलटसुलट मत्स्यांचें जुळें अशी असून संचार पाण्यांत, याचा स्वामी गुरु, पाठीकडून व मस्तकाकडून अशा दोन्ही भागांनीं उदय पावणारा, सौम्य, स्त्रीजातीचा, चर व स्थिर असा द्विस्वभावाचा, ऱ्हस्वदेही व मत्स्यवर्णाचा असा हा राशि आहे.

वर लिहिल्याप्रमाणें राशींचे स्वाभाविक धर्म ग्रंथांतून सांगितले आहेत.

## लग्नगुण

— १ —

मेषविलग्ने जातः प्रचण्डरोषो विदेशगमनरतः ।
लुब्धः कृशोऽल्पसौख्यः सेर्ष्यः स्खलिताभिधायी च ॥
पित्तानिलोष्ठरोगैरभितप्ततनुः क्रियापटुर्भीरुः ।
मेषर्क्षे धर्मपरश्चलोऽल्पमेधाः परार्थनाशकरः ॥
भोक्ता ख्यातः कुनखो भ्रातृविहीनस्तथा पितृत्यक्तः ।
शीघ्रगतिर्मन्दसुतो विविधार्थयुतः सुशीलश्च ॥
कुकुलोद्भतां सुशीलां स्वजनेऽपि च निर्घृणां स्त्रियं लभते ।
अपकृष्टोदयसौख्यः कुधर्मसंवर्धितार्थश्च ॥

**भावार्थ–मेष लग्नीं** जन्म असतां मनुष्य अतिशय रागीट, प्रवासाची विशेष आवड, लोभी, कृश, अल्पसुखी, उत्साही, अडखळत बोलणारा, वातपित्तात्मक रोगांनीं व्याप्त, भित्रा, धर्मवान्, चंचल, अल्पबुद्धीचा, दुसऱ्याच्या द्रव्याचा नाश करणारा, भोक्ता, प्रसिद्ध, वाईट नखें ज्याचीं असा, भावंडें नाहींत असा, बापानें टाकलेला, जलद चालणारा, सावकाश संतति होणारा, वाईट व दुष्ट अशी स्त्री ज्याला मिळते असा होतो.

— २ —

वृषभविलग्ने शूरः क्लेशसहिष्णुः सुखी रिपुनिहन्ता ।
बाल्ये सञ्चययुक्तः पृथुपीनललाटघोणगण्डोष्ठः ॥
उद्युक्तकर्मसुभगः पितुर्जनन्याः सुशर्मकृद्दाता ।
विविधव्ययोऽतिरौद्रः कफानिलात्मा पिता कुमारीणाम् ॥
स्वजनावमर्दनपरो धर्मनिवृत्तोऽबलाप्रियश्चपलः ।
भोजनपाननिगृध्नुर्नानाम्बरभूषणैकमतिः ॥

**भावार्थ–वृषभ लग्नीं** जन्म असतां शूर, क्लेश सहन करणारा, सुखी, शत्रुहन्ता, कपाळ, नाक व ओंठ हे भाग मोठे असून घट्ट, भाग्यवान्, आईबापांच्या आज्ञेंत राहणारा, अनेक प्रकारें धन खर्चिणारा, वातकफात्मक प्रकृतीचा, वस्त्रें, भूषणें, खाण्यापिण्याचे पदार्थ यांच्या ठिकाणीं विशेष आसक्ती, असा मनुष्य होतो.

— ३ —

मिथुनविलग्ने जातः प्रियदारो भूषणप्रदानरतिः ।
पूज्यवचः सुवचस्वी द्विमातृको रिपुविनीतः स्यात् ॥
गान्धर्वशिल्पकुशलः श्रुतिशास्त्रार्थप्रहास्यकाव्यमतिः ।
सौम्योऽथ मण्डनरुचिर्मदवश्यः स्यात्सतां सत्यः ॥
असहिष्णुरनिष्टसुतः शठोऽल्पबन्धुश्च संस्थितो भवति ।
हीनाधिकाङ्गपादो विनीतवृत्ताक्षिपक्ष्मा च ॥
चण्डाकारो वश्यो दारुणरिपुपक्षसंहरणशीलः ।
भूरत्नकाञ्चनोर्मिकजलार्थभागी भवेत्पुरुषः ॥

भावार्थ–मिथुन लग्नीं जन्म असतां स्त्रीलंपट, अलंकारांचें दान करणारा, चांगलें बोलणारा व ज्याचें भाषण पूज्य असतें असा, माता दोन, शिल्पशास्त्र, वेद, शास्त्रें, काव्य वगैरे जाणणारा असा मनुष्य होतो.

— ४ —

कर्किणि लग्ने भीरुर्नैकनिवासश्चलप्रज्ञः ।
मेधान्वितोऽतिधुर्यो गुह्यरुगार्तो निहन्ति रिपून् ॥
अन्तर्विषमः कामी द्विजदेवात्यर्चनप्रदानरतः ।
धर्मरतः कफबहुलो युवतितनुसंस्थितो गुणैर्नियतम् ॥
कन्यानुजो न बन्धुर्दृष्टाल्पसुतो विगर्हितकुटुम्बः ।
बहुमतकुत्सितयुवतिः परार्थभागी दृढग्राही ॥
परदेशगः सुधीरः साहसकर्मा जलाधिगतवित्तः ।
स्त्रीभूषणाम्बरसुखैर्भोगैश्च समन्वितो भवति ॥

भावार्थ–कर्क लग्नीं जन्म असतां मनुष्य एका ठिकाणीं न राहणारा, चंचल-बुद्धीचा, बुद्धिमान्, गुप्त रोगानें पीडित, शत्रुहन्ता, विषयी, कफप्रकृति, स्त्रियांच्या शरीराच्या ठिकाणीं असलेल्या गुणाचा, बहिणी अधिक, पुत्र अल्प, परदेशगमन करणारा, धैर्यवान्, स्त्रिया, अलंकार व पोषाख यांचें सुख भोगणारा असा होतो.

— ५ —

सिंहोदये प्रसूतो मांसरुचिर्नृपतिलब्धमानधनः ।
धर्माच्च्युतोऽप्यसंस्थः कुटुम्बकार्येषु रतवामः ॥

सिंहस्य समानमुखः स्थितिमान्गाम्भीर्यसत्त्वसंयुक्तः ।
धृष्टोऽल्पवचा लुब्धः परघातकरो बुभुक्षावान् ॥
पर्वतवनानुसारी सुरोषणो दृढसुहृत्प्रमादी च ।
दुष्प्रसहो हतशत्रुः ख्यातसुतः प्रणतसाधुजनः ॥
कृष्यादिकर्मधनवान् व्यापाररतो बहुव्ययो भवति ।
वेश्या नटी नियमनाद्भार्यातश्चातिदन्तरोगाच्च ॥

भावार्थ–सिंह लग्नीं जन्म असतां मनुष्य मांसावर भक्ति असणारा, राजापासून मान मिळवणारा, धर्म सोडलेला, सिंहमुखी, गंभीर, थोडकें बोलणारा, पर्वत आणि अरण्यें यांत संचार करणारा, शत्रुहन्ता, दंतरोगी अशा प्रकारचा होतो.

– ६ –

षष्ठे साधुत्वयुतः शिक्षागान्धर्वकाव्यशिल्पपटुः ।
प्रियवल्गुकथाभाषी प्रणयी दानोपचाररतः ॥
कन्याविलाससत्त्वस्थितिर्दयावान्परस्वभोक्ता च ।
भोक्ता देशभ्रमणः स्त्रीप्रकृतिर्विनयवाक् कितवः ॥
भूमण्डलवर्धनभाक् सुभगः कामी यशोच्छ्रयं लभते ।
ऋजुधर्मवान् सुरूपः सुरुचिः कान्तो गुरूणां च ॥
पापैरहार्यवृत्तैः सहजैश्च समं विरुद्धश्च ।
कन्याप्रजोऽनिलकफो नीचारिविवर्जितकथश्च ॥

भावार्थ–कन्या लग्नीं जन्म असतां मनुष्य चांगल्या स्वभावाचा, अनेक प्रकारच्या कला व काव्यें जाणणारा, गोड बोलणारा, स्त्रीप्रकृतीचा, सुंदर, कन्यासंतति विशेष, वातकफात्मक प्रकृतीचा असा होतो.

– ७ –

सप्तमलग्ने जातो विषमाङ्गः शीलवर्जितश्चपलः ।
उपचितहीनद्रविणः सुखहृद्देहानुसारी स्यात् ॥
कफवातिककलिरुचिको दीर्घमुखशरीरधर्ममतिवेत्ता ।
बहुदुःखभाक् सुमेधाः परावमर्दी सुचारुकृष्णाक्षः ॥
अतिथिद्विजदेवरतिः क्रतुक्रियावान् गुरुषु भक्तः ।
पूज्यः पितान्यभाजां जातः सत्यश्च मृदुशुक्रः ॥

भ्रातृप्रियोऽर्थमुख्यः शुचिश्च पापोपचारबन्धुश्च ।
कान्तः कुत्सितवृत्तो धर्मव्यवसायनीचमतिः ॥

**भावार्थ-तुला लग्नीं** जन्म असतां मनुष्य कफवातात्मक प्रकृतीचा, चेहरा व शरीर दीर्घ ( लांबट ), बुद्धिमान्, यज्ञकर्ता, गुरुभक्त, सत्त्वगुणी, पूज्य व भावंडांस आवडता अशा प्रकारचा होतो.

– ८ –

वृश्चिकलग्ने पुरुषः पीनपृथुव्यायताङ्गतीक्ष्णश्च ।
अन्तर्विषमः शूरो मातुरभीष्टो रतोद्यतस्त्यागी ॥
गम्भीरपिङ्गलोद्धतदृक्सुमहाहृन्निमग्नजठरश्च ।
अन्तर्विलग्नघोणः साहसनिरतः स्थिरश्चण्डः ॥
विश्वासहासवश्यः पित्तरुगार्तः कुटुम्बसम्पन्नः ।
गुरुसुहृदां द्रोहरतः पराङ्गनाकर्षणानुरतः ॥
बन्धोल्बणवक्त्रः स्याद्भूपतिसेवी सशत्रुपक्षः स्यात् ।
प्रयतोऽर्थदः सुयुवतिर्धर्मं प्रति वत्सलः क्षुद्रः ॥

**भावार्थ-वृश्चिक लग्नीं** जन्म असतां मनुष्य ठेंगणा, लठ्ठ व जाड अशा शरीराचा, कपटी, शूर, पिंगट व उद्धट दृष्टीचा, पित्तरोगी, कुटुंबसंपन्न, परस्त्रीरत, राजसेवक व क्षुद्र बुद्धीचा होतो.

– ९ –

कार्मुकलग्ने जातः स्थूलरदस्तुङ्गपृथुलमूर्धा च ।
प्रणतानां प्रियकारी धृतिसत्त्वसमन्वितः सुनयः ॥
मलिनासिकोष्ठकुनखी ह्रीमानतिपीवरोरुजठरश्च ।
विज्ञानशास्त्रकुशलः प्रत्यग्रमतिः प्रकोपश्च ॥
बलिनाममर्षणपरः कुलमुख्यो नाशितारिपक्षश्च ।
संग्रामपदश्रेष्ठश्छलबहुलच्छिद्रबन्धुगुणः ॥
शिल्पादिकर्मनिरतः स्वकर्मवाग्बन्धुवर्गशुभदश्च ।
क्रान्तो वदनाजिपदो नृपाद्धृतार्थः सुधर्मरतः ॥

**भावार्थ-धनु लग्नीं** जन्म असतां मनुष्य मोठ्या दांतांचा, उंच व मोठें अशा मस्तकाचा, धैर्यवान्, लढाऊ, कलाकुशल, राजाच्या द्रव्याचा उपभोग घेणारा व धर्मरत इत्यादि प्रकारचा होतो.

— १० —

मृगवदने लग्नस्थे कृशगात्रो भीरुरेणवक्त्रश्च ।
वातव्याधिभिरार्तः प्रदीप्ततुङ्गोग्रनासः स्यात् ॥
लघुसत्त्वोऽमिततनयो रोमचितः पाणिपादविस्तीर्णः ।
आचारगुणैर्हीनस्तृषार्तरामाभिराममतिः ॥
गिरिवनचारी शूरः शास्त्रश्रुतिशिल्पगेयवाद्यज्ञः ।
क्षुद्रबलः सकुटुम्बो द्विष्टो दुष्टश्च बन्धुशठः ॥
कुत्सितशीलः कान्तः कुत्सितदारोऽनसूयको धनवान् ।
धर्मरतो नृपसेवी न चातिदाता सुखी सुभगः ॥

**भावार्थ-मकर लग्नीं** जन्म असतां मनुष्य रोडका, भित्रा, मेंढ्याच्या तोंडासारखें तोंड ज्याचें असा, वातरोगी, उंच नाकाचा, संतति पुष्कळ, हातपाय मोठे, अनाचारी, स्त्रीलंपट, पर्वत व अरण्यें यांत फिरणारा, शास्त्रें, वेद, कला, गाणें व वादन जाणणारा, द्वेषी, दुष्ट इ० प्रकारचा होतो.

— ११ —

कुम्भविलग्ने पुरुषः सुनीचकर्मा कुलाधिको मूर्खः ।
स्फुटिताग्रनसो नीचः सक्रोधपरोऽलसात्मा च ॥
वैरिप्रियोऽप्रहृष्टः पारुष्यद्यूतनीचदासीष्टः ।
उपहृतबन्धुः क्षुब्धः क्षयोदयी प्राप्तवित्तश्च ॥
पिशुनः शठो दरिद्रो विनष्टबन्धुर्बहिष्कृतो लोके ।
नो संमतः परेषां प्रकृष्टसम्पद्गुरुरतिश्च ॥

**भावार्थ-कुंभ लग्नीं** जन्म असतां मनुष्य नीच कृत्यें करणारा, कुलश्रेष्ठ, मूर्ख, चोंचीसारखें नाक, रागीट, आळशी, जुगारी, क्षयरोगी, लबाड, धूर्त व दरिद्री अशा प्रकारचा होतो.

— १२ —

मीनविलग्ने जातो धन्यः स्फुटनासिकोऽस्फुटाक्षश्च ।
विज्ञानकाव्यबुद्धिर्मानादरलब्धकीर्तिश्च ॥
विवृतोष्ठरदः कुष्ठी विदारितास्यो वृषादिसंलुब्धः ।
दाक्षिण्यप्रत्ययवान् मेषच्छागादिसम्पन्नः ॥

शौचाचारश्रुतिवाग्धृतिमान् कन्याप्रजो विनीतश्च ।
सौम्यमतिः सत्त्वयुतो गान्धर्वस्त्रीरतिज्ञश्च ॥
बहुशीलोदारमतिर्भ्रातृधनोऽमर्षणः सुबन्धुश्च ।
बलवति राशावेतत्तदधिपतौ वा बलं सर्वम् ॥

**भावार्थ-मीन लग्नीं** जन्म असतां मनुष्य चांगल्या नाकाडोळयाचा, ज्ञानी, कवि, तोंड पसरून बोलणारा, बकऱ्या व मेंढे यांचे कळप बाळगणारा, मुली ज्याला फार होतात, सत्त्वगुणी इत्यादि प्रकारचा होतो.

वरील सर्व श्लोकांचें शब्दशः भाषांतर न देण्याचें कारण, तीं लक्षणें कुंडली मांडण्याच्या कामीं निरुपयोगी आहेत. प्राचीन ग्रंथकारांनीं या कामीं कसा प्रयत्न केला आहे व तो अनुभवाशीं कितपत जुळतो हें वाचकांनीं पाहावें म्हणून हे श्लोक सारावलीवरून अक्षरशः दिले आहेत. त्या ग्रंथाच्या ४७ व्या अध्यायांत "**दश-विधचिह्नैर्ज्ञात्वा जातं पुरुषं प्रसाधयेल्लग्नम् । अत एव प्रथमतरं तानि समस्तान्यहं वक्ष्ये ॥**" असें म्हटलें आहे, पण हीं दहा चिन्हें कोणतीं तें स्पष्ट सांगितलें नाहीं.

## चंद्रगुण

– १ –

वृत्तातातम्रदृगुष्णशाकलघुभुक् क्षिप्रप्रसादोऽटनः
कामी दुर्बलजानुरस्थिरधनः शूरोऽङ्गनावल्लभः ।
सेवाज्ञः कुनखी व्रणाङ्कितशिरो मानी सहोत्थाग्रजः
शक्त्या पाणितलेऽङ्कितोऽतिचपलस्तोये च भीरुः क्रिये ॥ १ ॥

**अर्थ**-ताम्र वर्णाचे व गोल असे नेत्र, उष्ण भाज्या वगैरे भक्षण करणारा, लवकर प्रसन्न होणारा, फिरणारा, विषयी, गुडघे दुर्बल, अस्थिर संपत्ति, शूर, स्त्रियांस प्रिय, सेवाकर्म जाणणारा, वाईट नखांचा, डोक्यावर निशाण्या, मानी, भावंडांत वडील, तळहातावर चिन्हें, अतिशय चपळ व पाण्याला भित्रा, असे **मेष राशींतल्या चंद्राचे** गुण आहेत.

– २ –

कान्तः खेलगतिः पृथूरुवदनः पृष्ठास्यपार्श्वेऽङ्कित-
स्त्यागी क्लेशसहः प्रभुः ककुदवान्कन्याप्रजः श्लेष्मलः ।

पूर्वैर्बन्धुधनात्मजैर्विरहितः सौभाग्ययुक्तः क्षमी
दीप्ताग्निः प्रमदाप्रियः स्थिरसुहृन्मध्यान्त्यसौख्यो गवि ॥ २ ॥

अर्थ–देखणा, खेळत चालणारा, मोठ्या मांड्या व मोठें तोंड, पाठ, तोंड व पार्श्वभाग यांवर चिन्हें, दाता, क्लेश सोसणारा, श्रेष्ठ, छत्रचामरादि वैभवशाली, कन्या संतति, कफप्रकृति, बंधु, धन व मुलें यांनीं रहित, भाग्यशाली, क्षमावान्, प्रदीप्त असा जठराग्नि, तरुणींना आवडता, चिरकालचे मित्र, वयाच्या मध्यें व शेवटीं सुखी हे वृषभ राशींतल्या चंद्राचे गुण आहेत.

– ३ –

स्त्रीलोलः सुरतोपचारकुशलस्ताम्रेक्षणः शास्त्रवित्
दूतः कुञ्चितमूर्धजः पटुमतिर्हास्येङ्गितद्यूतवित् ।
चार्वङ्गः प्रियवाक् प्रभक्षणरुचिर्गीतप्रियो नृत्यवित्
क्लीबैर्याति रतिं समुन्नतनसश्चन्द्रे तृतीयर्क्षगे ॥ ३ ॥

अर्थ–स्त्रीलंपट, विलासी, आरक्त नेत्र, शास्त्र जाणणारा, सेवक, केश कुरळे, चतुर, हांसणारा, मर्मज्ञ, जुगारी, देखणा, गोड बोलणारा, खादाड, गाण्याचा शोकी, नृत्य जाणणारा, नपुंसकांवर प्रीति करणारा व सुरेख नाक हे मिथुन राशींतल्या चंद्राचे गुण आहेत.

– ४ –

आवक्रद्रुतगः समुन्नतकटिः स्त्रीनिर्जितः सत् सुहृत्
दैवज्ञः प्रचुरालयः क्षयधनैः संयुज्यते चन्द्रवत् ।
ह्रस्वः पीनगलः समेति च वशं साम्ना सुहृद्वत्सल-
स्तोयोद्यानरतः स्ववेश्मसहिते जातः शशाङ्के नरः ॥ ४ ॥

अर्थ–वांकडें व जलद चालणारा, उच्च असा कटिभाग, स्त्रीनें जिंकलेला, चांगले मित्र, ज्योतिषी, घरें पुष्कळ, चंद्राप्रमाणें क्षयवृद्धि असें धन, तोकडी असून मांसल अशी मान, सामोपचारानें वश होणारा, मित्रवत्सल, पाणी व बागा यांच्या ठिकाणीं रममाण होणारा हे कर्क राशींतल्या चंद्राचे गुण आहेत.

– ५ –

तीक्ष्णः स्थूलहनुर्विशालवदनः पिङ्गेक्षणोऽल्पात्मजः
स्त्रीद्वेषी प्रियमांसकाननगः कुप्यत्यकार्ये चिरम् ।

क्षुत्तृष्णोदरदन्तमानसरुजा सम्पीडितस्त्यागवान्
विक्रान्तः स्थिरधीः सुगर्वितमनो मातुर्विधेयोऽर्कभे ॥ ५ ॥

अर्थ—तापट, मोठी हनुवटी, मोठें तोंड, पिंगट डोळे, संतति अल्प, स्त्रियांचा द्वेषी, मांस, अरण्यें व पर्वत हीं प्रिय, विनाकारण रागावणारा, क्षुधा, तृषा, उदर, दांत व मन यांची ज्याला व्यथा, दाता, पराक्रमी, स्थिरबुद्धीचा, गर्विष्ठ व मातृभक्त हे सिंह राशींतील चंद्राचे गुण आहेत.

– ६ –

व्रीडामन्थरचारुवीक्षणगतिः स्रस्तांसबाहुः सुखी
श्लक्ष्णः सत्यरतः कलासु निपुणः शास्त्रार्थविद्धार्मिकः ।
मेधावी सुरतप्रियः परगृहैर्वित्तैश्च संयुज्यते
कन्यायां परदेशगः प्रियवचः कन्याप्रजोऽल्पात्मजः ॥ ६ ॥

अर्थ—लज्जित, मंद व सुंदर असें अवलोकन व गमन करणारा, खांद्यांमध्यें शिथिल, सुखी, मृदुभाषणी, सात्त्विक, कलाकुशल, शास्त्रज्ञ, धार्मिक, बुद्धिमान्, सुरतप्रिय, दुसऱ्याचें घर व धन यांचा उपभोग घेणारा, परदेशांत जाणारा, गोड बोलणारा, कन्यासंतति व पुत्र अल्प हे कन्या राशींतील चंद्राचे गुण आहेत.

– ७ –

देवब्राह्मणसाधुपूजनरतः प्राज्ञः शुचिः स्त्रीजितः
प्रांशुश्चोन्नतनासिकः कृशचलद्गात्रोऽटनोऽर्थान्वितः ।
हीनाङ्गः क्रयविक्रयेषु कुशलो देवद्विनामा सरुक्
बन्धूनामुपकारकृद्विरुषितस्त्यक्तस्तु तैः सप्तमे ॥ ७ ॥

अर्थ—देव, ब्राह्मण व साधु यांची पूजा करणारा, मोठा शहाणा, पवित्र, स्त्रीनें जिंकलेला, उंच व सरळ नाकाचा, कृश व शिथिल अवयवांचा, प्रवासी, धनवान्, व्यंग, देवघेवींत कुशल, देवांचीं दोन नांवें ज्याला, रोगी, बंधूंवर उपकार करणारा व बंधूंनीं टाकलेला हे तुला राशींतील चंद्राचे गुण आहेत.

– ८ –

पृथुलनयनवक्षो वृत्तजङ्घोरुजानु-
र्जनकगुरुवियुक्तः शैशवे व्याधितश्च ।
नरपतिकुलपूज्यः पिङ्गलः क्रूरचेष्टो
झषकुलिशखगाङ्कच्छन्नपापोऽलिजातः ॥ ८ ॥

**अर्थ**–डोळे व वक्षःस्थल हे अवयव मोठे, मांड्या व पोटऱ्या गोल, पिता व गुरु यांनीं सोडलेला, बालपणीं रोगी, राजघराण्यांत पूज्य, पिंगट डोळयांचा, खोड्या काढणारा, ज्याच्या हातावर मत्स्य, वज्र व पक्षी यांचीं चिन्हें, अंतस्थ पापाचरण करणारा हे **वृश्चिक राशींतल्या चंद्राचे** गुण आहेत.

– ९ –

व्यादीर्घास्यशिरोधरः पितृधनस्त्यागी कविर्वीर्यवान्
वक्ता स्थूलरदश्रवाधरनसः कर्मोद्यतः शिल्पवित् ।
कुब्जांसः कुनखी समांसलभुजः प्रागल्भवान् धर्मवित्
बन्धुद्विट् न बलात्समेति च वशं साम्नैकसाध्योऽश्वजः ॥ ९ ॥

**अर्थ**–दीर्घ कंठ व मुख, बापाचें धन उपभोगणारा, दाता, कवि, पराक्रमी, वक्ता, दांत, कान, ओंठ व नाक हे अवयव मोठे, उद्योगी, शिल्पज्ञ, आंखूड खांदे, नखें वाईट, मांसल दंड, प्रगल्भ, धर्मज्ञ, बंधुद्वेषी, भीतीनें वश न होणारा व सामोपचारानें वश होणारा हे **धनु राशींतल्या चंद्राचे** गुण आहेत.

– १० –

नित्यं लालयति स्वदारतनयान्धर्मध्वजोऽधः कृशः
स्वक्षः क्षामकटिर्गृहीतवचनः सौभाग्ययुक्तोऽलसः ।
शीतालुर्मनुजोऽटनश्च मकरे सत्त्वाधिकः काव्यकृत्
लुब्धोऽगम्यजराङ्गनासु निरतः सन्त्यक्तलज्जोऽघृणः ॥ १० ॥

**अर्थ**–स्त्री व मुलें यांचे लाड करणारा, दांभिक, कमरेखालीं कृश, सुंदर नेत्रांचा, कमर बारीक, लवकर समजणारा, आळशी, भाग्यवान्, प्रवासी, शीतप्रकृति, सात्त्विक, कवि, लोभी, अगम्य व वृद्ध स्त्रीशीं रममाण होणारा, निर्लज्ज व निर्दय हे **मकर राशींतल्या चंद्राचे** गुण आहेत.

– ११ –

करभगलः शिरालुः खरलोमशदीर्घतनुः
पृथुचरणोरुपृष्ठजघनास्यकटिर्जरठः ।
परवनितार्थपापनिरतः क्षयवृद्धियुतः
प्रियकुसुमानुलेपनसुहृद्घटजोऽध्वसहः ॥ ११ ॥

**अर्थ**–उंटासारखी लांब मान, शिरायुक्त देह, रांठ केश, उंच बांधा, पाय, मांड्या, पाठ, कमर, तोंड हे भाग मोठे, वृद्ध, परस्त्रीरत, पापाचरणी, क्षय-

वृद्धि पावणारा, फुलें व उट्या धारण करणारा, हे **कुंभ राशींतील चंद्राचे** गुण आहेत.

-१२-

जलपरधनभोक्ता दारवासोनुरक्तः
समरुचिरशरीरस्तुङ्गनासो बृहत्कः ।
अभिभवति सपत्नांस्त्रीजितश्चारुदृष्टि-
र्द्युतिनिधिधनभोगी पण्डितश्चान्त्यराशौ ॥ १२ ॥

**अर्थ**—जलधन ( मोत्यें वगैरे ) व परधन यांचा उपभोग घेणारा, स्त्री व वस्त्रें यांच्या ठिकाणीं अनुरक्त, सुंदर व सारख्या शरीराचा, नाक उंच, मस्तक मोठें, शत्रूंचा पराजय करणारा, स्त्रीनें जिंकलेला, नेत्र चांगले कांतिमान्, संचित धनाचा उपभोग घेणारा आणि पंडित हे **मीन राशींतील चंद्राचे** गुण आहेत.

याप्रमाणें बृहज्जातकांत चंद्रराशीचे गुण वर्णन केले आहेत.

## रविगुण

१ **मेष**—प्रख्यात, चतुर, दक्ष, भ्रमणशील, अल्पवित्त, शस्त्रधारी.

२ **वृषभ**—वस्त्रें, सुगंधी पदार्थ व व्यापार यांवर उपजीविका करणारा, स्त्रीद्वेषी व गायनवादनांत कुशल.

३ **मिथुन**—विद्वान्, ज्योतिषी व द्रव्यवान्.

४ **कर्क**—तीव्र, निर्धन, परोपकारी, श्रम व मार्ग यांनीं क्लेश पावणारा.

५ **सिंह**—वनें, डोंगर व गुरें यांविषयीं भक्ती बाळगणारा, दांडगा व मूर्ख.

६ **कन्या**—लिहिणें, वाचणें, काव्य व गणित यांमध्यें ज्ञाता व स्त्रीसदृश देह.

७ **तुला**—दारू विकणारा, प्रवासप्रिय, सोन्याचा व्यवहार करणारा व नीच.

८ **वृश्चिक**—क्रूर, साहसी, विषारी पदार्थांपासून धन मिळविणारा, शस्त्रनिपुण.

९ **धनु**—पूज्य, सधन, तीव्र, वैद्य व आचारी.

१० **मकर**—नीच, मूर्ख, वाईट उदीम करणारा, अल्पधनी, लोभी व दुसऱ्याच्या भाग्यावर अवलंबून असणारा.

११ **कुंभ**—नीच, पुत्रांनीं सोडलेला, भाग्यभ्रष्ट व निर्धन.

१२ **मीन**—मोत्यें, पोवळीं वगैरे जलोत्पन्न पदार्थांचा व्यापारी व स्त्रियांपासून आदर पावणारा.

याप्रमाणें बृहज्जातकांत रवीच्या राशींचे गुण सांगितले आहेत.

## अयनगुण

**शश्वत्प्रसन्नं ननु सूनुकान्तासन्तोषयुक्तोतितरां चिरायुः ॥**
**नरः सदाचारपरोप्युदारो धीरश्च सौम्यायनजातजन्मा ॥ १ ॥**

**अर्थ**–उत्तरायणांत जन्म असतां लवकर प्रसन्न होणारा, पुत्र व स्त्री यांपासून संतोष पावणारा, सदाचारी, उदार व धैर्यवान् असा मनुष्य होतो.

**अखर्वगर्वः कृषिकर्मकर्ता चतुष्पदाढ्योऽतिकठोरचित्तः ॥**
**शठोऽप्यसद्यो ननु मानवानां याम्यायने ना जननं प्रपन्नः ॥ २ ॥**

**अर्थ**–गर्विष्ठ, शेतकरी, जनावरें पाळणारा, कठोर, लबाड, दुष्ट असा दक्षिणायनांतला मनुष्य होतो.

## पक्षगुण

**चञ्चच्चिरायुः सुतरां सुशीलः श्रीपुत्रवान् कोमलकायकान्तिः ॥**
**सदा सदानन्दविनीतकालश्चेज्जन्मकालस्तु वलक्षपक्षे ॥ १ ॥**

**अर्थ**–चंचल, दीर्घायु, चांगल्या स्वभावाचा, पुत्र व संपत्ति यांचें सुख भोगणारा व आनंदी असा शुद्ध पक्षांतला मनुष्य असतो.

**प्रतापशीलो विषयश्च लोलः कलिप्रियः स्वीयकुलोद्धतश्च ॥**
**मनोभवाधिक्ययुतो नितान्तं सितेतरे यस्य नरस्य जन्म ॥ २ ॥**

**अर्थ**–पराक्रमी, बलहीन, भांडखोर, आपल्या कुळांत उद्धट व अत्यंत कामी असा कृष्ण पक्षांतला मनुष्य असतो.

## दिनरात्रिगुण

**तेजस्वी पितृसादृश्यश्चारुदृष्टिर्नृपप्रियः ॥**
**बन्धुपूज्यो धनाढ्यश्च दिवाजातो नरो भवेत् ॥ १ ॥**

**अर्थ**–तेजस्वी, बापासारखा, नेत्र चांगले, राजाला प्रिय, बंधुपूज्य व श्रीमंत असा दिवसास जन्म असतां होतो.

**मन्ददृक् बहुकामार्तः क्षयरोगी मलीमसः ॥**
**क्रूरात्मा छन्नपापश्च निशिजातो नरो भवेत् ॥ २ ॥**

**अर्थ**–मंद दृष्टी, अतिशय विषयी, क्षयरोगी, पापी, क्रूर, अंतःकरण पापी असा रात्रीं जन्म असतां होतो.

चेहऱ्यावरून कुंडली मांडणारास वय, लग्न, चंद्र व रवि इतक्या गोष्टी अवश्य कळल्या पाहिजेत. वयावरून शनि, राहु व गुरु असे तीन ग्रह कळतात, रवि आणि लग्न यांवरून जन्माची वेळ समजते, व रवि आणि चंद्र यांवरून महिना आणि तिथि कळते. म्हणून प्रथम वय, नंतर लग्न आणि चंद्र व शेवटीं रवि सांगण्याचा अभ्यास करावा. बाबाजीराव मनुष्य पाहतांच रवि सांगत असत असें म्हणतात. आम्हांस रवीचीं लक्षणें समजलेलीं नाहींत.

## लटपटपंची

अयनें, पक्ष व दिवसरात्र यांचीं उत्तरें प्रथम काढून घेऊन नंतर रवि सांगावा. अयनें, पक्ष व दिवसरात्र यांची संख्या २ च असल्यामुळें उत्तरें सहज निघतात. उदा०—प्रथम "तुमचें उत्तरायण आहे काय?" असा आपण प्रश्न केला, तर पृच्छक होय किंवा नाहीं म्हणेल. होय म्हणेल तर ठीकच, पण नाहीं म्हणाला तरी आपलें काम होतें. कारण—

**मकरारंभापासून मिथुनान्तापर्यंत–उत्तरायण.**

**कर्कारंभापासून धन्वन्तापर्यंत–दक्षिणायन.**

'होय' म्हणेल तर आपणास रवि हा मकर राशीपासून सहा राशींतला आहे, इतकें समजेल. आणि 'नाहीं' म्हणेल तर तो कर्क राशीपासून सहा राशींतला आहे असें कळेल. अयनांची शारीरिक खूण काय असावी हें कोणी शोधून काढील तर तो बिनचूक सांगेल. कित्येक पृच्छकाचा 'शेक हँड' करितांना जसा हात धरितों तसा धरून हाताला लागणाऱ्या सर्दपणावरून अगर रूक्षपणावरून उत्तरायण अगर दक्षिणायन कळतें असें म्हणतात. तें व वर श्लोकांत जे गुण सांगितले आहेत ते, अवलोकनशक्ती आणि कल्पनाशक्ती या चवकडीच्या साह्यानें परमेश्वर स्फूर्ति देईल तसें सांगावें. बहुधा बरोबरच येईल. नष्टजातकांत अयन सांगण्याची एक रीति आहे ती अशीः—

**आधानजन्मापरिबोधकाले सम्पृच्छतो जन्म वदेद्विलग्नात् ॥**
**पूर्वापरार्धे भवनस्य विन्द्याद्भानावुदग्दक्षिणगे प्रसूतिम् ॥**

प्रश्नलग्नकुंडली मांडून लग्न हें राशीच्या पूर्वार्धीं ( १५ अंशांच्या आंत ) असतां उत्तरायण व द्वितीयार्धीं ( १५ अंशांच्या पुढें ) असतां दक्षिणायन सांगावें.

सारांश, या सर्व साधनांनीं प्रथम अयन सांगावें. लग्न समजलें असून अयन समजलें कीं जन्मकालाची मर्यादा समजते. जसें:—




वृषभ लग्न व उत्तरायण इतकें ज्ञान झालें असेल तर रवि कुंडलींत फुली मारलेल्या ठिकाणींच पाहिजे हें उघड आहे. हीं स्थलें पहांटेच्या ५ घ. रात्रीपासून सायंकाळीं ५ घ. दिवस शिल्लक आहे इतक्या अवधींतलीं आहेत असें निश्चयानें ज्ञान होतें. नंतर डोळयांच्या तेजावरून व आकृतीवरून दिवस अगर रात्र यांचा पक्का निश्चय करावा.

अयनाप्रमाणेंच पक्षाचें उत्तर काढून घ्यावें. कित्येक हाताच्या आंगठ्याच्या पेरावर जी यवाकृति असते तीवरून पक्ष सांगतात व कित्येक कानाच्या खालच्या पाळयांवरून सांगतात. कानांच्या पाळ्या जर मस्तकाला अगदीं लागून असतील तर कृष्णपक्ष व सूट असेल तर शुद्ध पक्ष. त्याचप्रमाणें यव पोकळ असेल तर शुद्धपक्ष व भरीव असेल तर वद्यपक्ष. अशीं कांहीं चिन्हें पाहून जी आपणांस स्फूर्ति होईल तिच्या साह्यानें पक्ष सांगावा. पक्ष दोनच असल्यामुळें उत्तर चुकलें तरी आपलें काम होतें. चंद्र व पक्ष यांच्या ज्ञानानें रवि बिनचूक कळेल. वरील उदाहरणांत आपण रवीचीं स्थानें नियमित केलीं आहेत व चंद्र कन्येंत असून शुद्ध पक्ष आहे असें आतां समजलें, तर रवि मीन अगर मेष राशींतच असला पाहिजे असें खात्रीनें ज्ञान होईल. कारण, पुढील राशींत तो रात्रीच्या भागांत जातो. सारांश, लग्न–चंद्र–अयन–पक्ष–दिवा–रात्र यांवरून रवीचें स्थान निश्चित होईल, रवीचें अंधुक ज्ञान झाल्यानंतर स्पष्ट ज्ञानार्थ मागील रविगुण विचारांत घ्यावे.

रवि व पक्ष आणि चंद्र यांवरून सुमाराची तिथि सांगतां येईल व महिना बरोबर सांगतां येईल हें उघड आहे. परंतु ही लटपटपंची आहे, खरें ज्ञान नाहीं. कित्येक पोटभरू ज्योतिषी अशा प्रकारची लटपटपंची करून अज्ञानी मनुष्यास कसें चकवतात हें दाखविण्याचा या लेखाचा उद्देश आहे.

## लग्न व चंद्र

चेहरा, डोळे, शरीर व त्याचे अवयव, स्वर, दंतपंक्ति, वाणी, केश, हावभाव व शरीरावरील चिन्हें यांच्या साह्यानें लग्न व चंद्र यांचें ज्ञान होतें यांत तिलप्राय शंका नाहीं. अवलोकनशक्ती ज्या मानाची असेल त्या मानानें या कामीं यश मिळाल्याशिवाय राहाणार नाहीं. खालीं लिहिलेल्या लक्षणांवरून लग्न व चंद्र यांचें ज्ञान झालें पाहिजे. ज्या ज्या वेळीं हीं लक्षणें आढळतील, त्या त्या वेळीं अमुक लग्न व अमुक राशि असें निःसंशय सांगण्यास हरकत नाहीं. या लक्षणांत सर्व मनुष्यें येतील असें मात्र म्हणवत नाहीं. कारण, ईश्वरी कृतीचें वर्गीकरण करणें फार कठीण किंबहुना अशक्य आहे ! असो. आज जितकें समजलें आहे तितकें सर्व येथें लिहिलें आहे. अभ्यासी मनुष्यानें त्याचा योग्य उपयोग करून आपलें ज्ञान वाढवावें.

**मेष**—अश्विनी, भरणी व कृत्तिकाचा एक चरण मिळून मेष राशि होतो. या प्रत्येक नक्षत्राचें स्वरूप भिन्न आहे. त्यामुळें या राशीचीं जीं लक्षणें खालीं सांगितलीं आहेत, त्यांत परस्पर विरोध आढळेल. प्रत्येक राशींत असाच प्रकार आहे. अमुक नक्षत्राचें अमुक लक्षण असें सुलभजातक भाग ३ रा यांत वर्णिलें आहे. आम्हांस मेष राशीच्या मनुष्याच्या ठिकाणीं जीं जीं लक्षणें आढळलीं तीं तीं समुदायानें या पुस्तकांत ग्रथित केलीं आहेत, म्हणून विरोधाकडे नक्षत्र-भिन्नत्वानें अवलोकन करावें.

चालचलणूक अजागळासारखी, बोलणें अडखळत, फार बोलावयास नको, एकान्त अधिक प्रिय, हंसणें फारच कमी व तेंही फक्त चेहऱ्यावर दिसणारें, शब्द फिका घोगरा ( रडव्या मनुष्यासारखा ), दांत ओंठाच्या बाहेर आलेले किंवा दिडके, दांतांची पुढली खालची कवळी बकऱ्याच्या दांतांसारखी अरुंद व कंसाकार, मुद्रा रागीट, चालणारा व पळणारा जबर, लांबलांबचे प्रवास करणारा, वारंवार स्थलांतर करणारा, फिरण्याचा उद्योगधंदा करणारा, शरीर सडपातळ, वर्ण तांबुस, दांतांतून रक्त येण्याची व्यथा किंवा दुसरा कोणताही दंतरोग, सांगकाम्या किंवा स्वतः विचार न करितां दुसरा सांगेल तसें ऐकणारा, राग पुष्कळ पण रागाचे आविर्भाव फार कमी, डोळे लालसर पिंगट, मस्तकावर, तोंडावर अथवा कोणत्याही शिरोभागावर कसल्या तरी निशाण्या, प्रकृति उष्ण, बहुधा ज्वरांचे व रक्ताचे

विकार, तामसी, निग्रही, आपला हट्ट शेवटास नेणारा व मनांत येईल त्याचा गव-गवा न करितां काम करणारा, अवयव काटक असें या राशीचें स्वरूप आहे. सर्व राशींत हा राशि लवकर ओळखतो व या राशीचीं मनुष्येंही बरींच आढळ-तात. पुढारीपणानें वागणारे व भिक्षुक किंवा याचक हे मेष राशीचे आढळतात.

या राशींत जर रवि असेल तर डोळे घारे असतील. रवि व मंगळ एकत्र असतील तर विशेष घारे. मंगळ असेल तर डोळे व केश तांबुस पिंगट अस-तील. या राशींत जर लग्नीं एकटा रवि असेल तर तो मनुष्य उंच असून शरीर तप्त असेल व मस्तकशूल असेल. मंगळ कृत्तिकांत असेल तर शरीराच्या कोणत्या तरी भागांतून रक्त जाण्याचा विकार असेल, तोंड व छाती हे भाग विशेष लाल असतील, मस्तकांत गळवें, खांडकें वगैरे विकार होऊन त्यांच्या निशाण्या असतील, पडून जखमा झाल्याच्या खुणा असतील किंवा देवींचे वण असतील.

रवि किंवा मंगळ या राशींत दुसऱ्या स्थानांत असतील तर डोळे अति घारे व दुखरे असतील. असल्या माणसांस डोळे येण्याची संवय विशेष असते.

चवथ्या अगर सहाव्या स्थानांत हे ग्रह असतील तर अपघात होतील, अग्निभय होईल, आंगावर डाग असेल, भयंकर ताप येतील, गोंवर व देवी यांच्यापासून फार त्रास होईल, जाळवात किंवा भयंकर आम्लपित्त असेल.

या राशींत लग्नीं शनि असेल तर तो बोलतांना फार अडखळेल किंवा दुसऱ्या कांहीं खोड्या असतील, दांत आंवळून बोलेल, डोळे मळकट, बारीक व खोल असून किंचित् पिंगट असतील. शनीच्या जोडीला रवि किंवा मंगळ असेल किंवा दोन्ही असतील तर डोळे थेट मांजराप्रमाणें असतील.

या राशींत रवि अगर शनि कोठेंही असले तरी शब्द फिका घोगरा असतो.

**वृषभ**—कृत्तिकाचे तीन चरण, रोहिणी व मृगाचे दोन चरण मिळून वृषभ राशि होतो. या राशीचीं माणसें क्वचित् आढळतात. बांधा गोंडस व मध्यम उंच, दांत सफेत, वर्ण सफेत गौर व तेजस्वी, चेहरा मोहक व सुंदर, नेत्र सफेत असून तेजस्वी, प्रकृति निरोगी, गाल व हाताचीं मनगटें गोल असून भरदार, विशेषतः शरीरांत वर्तुलत्व, तेज व अति स्वच्छता हे गुण विशेष दृष्टीस पडतात. तोंडावर वांग असतात. या राशीच्या स्त्रिया अति तेजस्वी व गौर असतात.

या राशींत गुरु, चंद्र किंवा शुक्र असतां शरीराचा व दांताचा वर्ण स्फटिकाप्रमाणें शुभ्र व तजेलदार असतो.

वरील वर्णन रोहिणीविभागांत चांगलें जुळेल, त्या मानानें इतर भागांत जुळणार नाहीं.

मिथुन—मृगाचे दोन चरण, आर्द्रा व पुनर्वसूचे तीन चरण मिळून मिथुन राशि होते. या राशीचीं माणसें बरीच आढळतात. चेहरा सुरेख व हनुवटीच्या भागाकडे निमुळता व लांबट, डोकें मागल्या बाजूला नारळासारखें लांबट, शरीर सडपातळ व उंच, वर्ण हिरवट काळा, नेत्र काळे, केश बारीक, स्वर मंजुळ, वाणी स्पष्ट, बोलकेपणा विशेष, वक्ता, विद्वान्, विद्याव्यासंगी, भाषाशास्त्र उत्तम जाणणारा, शास्त्री, पुराणिक, वेंचे-म्हणी-श्लोक यांचा उपयोग बोलण्यांत अधिक, पोक काढून चालणें, अशीं या राशीचीं लक्षणें आहेत.

कर्क—पुनर्वसूचा एक चरण, पुष्य व आश्लेषा मिळून कर्क राशि होते. प्रवासी, उत्तम पोहणारा, बागबगीच्याचा शोकी, जलाशयाच्या सन्निध जन्म पावणारा किंवा राहाणारा, फिरतीचा धंदा करणारा, गायनज्ञ, पुढले दांत रुंद व मोठे असून सहज दिसणारे, चेहरा गोल असून मोहक, हाताचे पंजे व बोटें आणि पावलें हे अवयव मोठाले, जबर धांवणारा, जलद परंतु वांकडीं पावलें टाकून चालणारा, शूर, अभद्र बोलणारा, चैनी, स्त्रियांचा शोकी, द्विभार्या, वर्ण काळासांवळा, बांधा साधारण मजबूत, उंची मध्यम, व्यसनी आणि अनेक स्त्रिया भोगणारा व लाळ्या, अशा प्रकारचें या राशीचें स्वरूप आहे.

या राशींत लग्नीं गुरु असतां वर्ण गोरा व बांधा चांगला असतो, आणि निर्व्यसनी राहतो. शुक्र व चंद्र असतां अति चैनी होतो. गाण्याचा, वाजवण्याचा किंवा नाटकाचा विशेष शोक असतो. मंगळ, शनि व राहु असतां व्यसनी, हलकट विचारांचा व रोगट प्रकृतीचा होतो. चतुर्थ अथवा षष्ठ स्थानीं या राशींत हे ग्रह असतील तर दुःख, दारिद्र्य आणि विपत्ति भोगणारा होऊन बहुधा पोटदुख्या किंवा उदररोगी होईल. दमा व हार्टडिसीझ् हे या राशीचे रोग आहेत.

सिंह—मघा, पूर्वा व उत्तराचा एक पाद मिळून सिंह राशि होते. दांत अतिशय मजबूत, छाती रुंद व भरदार, कपाळ विस्तीर्ण असून किंचित् पुढें आलेलें, चेहरा भुंवयांच्या बाजूनें सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास सिंहासारखा दिसतो, नाक

नकटें, शरीर मजबूत, तालीमबाज, वर्ण काळा, शब्द मोठा, निधड्या छातीचा, नेहमीं घरीं दारीं प्रमुखत्वानें वागणारा, अधिकारी (ऑफिसर), प्रख्यात, छाती पुढें करून चालणारा व उभा राहाणारा, धिप्पाड, किल्ले, पर्वत आणि अरण्यें यांत कोणत्या तरी कारणानें निवास व त्याची आवड, अशा प्रकारचें या राशीचें स्वरूप आहे.

या राशींत गुरु, चंद्र, शुक्र, बुध हे ग्रह असतां वर्ण गोरा होतो, चेहऱ्याची दुसऱ्यावर सहज छाप बसते, कपाळ रुंद होतें व डोक्याचा भागही मोठा होतो. रवि असतां बहुधा वर्ण काळा होतो, पण शरीर मजबूत व अतिशय काटक होतें. मंगळ असतां प्रकृति अतिशय उष्ण होते, शरीर फार काटक, वर्ण तांबुस, नेत्र पिंगट आणि मुद्रा लढाऊ व अति गंभीर दिसते. तो दुसऱ्या मनुष्याला आपल्या ताब्यांत वागवणारा, कपाळ फार पुढें व त्यावर उंचवटा, कडकडीत अंमलदार, सेनापति होण्याला योग्य, अपघात, दुखापती आणि रक्तस्राव यांचें भय विशेष असा होतो. शनि किंवा राहु असतां शरीर सोशिक होतें, पण रोगट होतें. प्रमुखत्व प्राप्त होत नाहीं. शत्रुभय विशेष होतें.

**कन्या**—उत्तराचे तीन चरण, हस्त अणि चित्राचे दोन चरण मिळून कन्या राशि होतो. लाजाळू, उभा राहिल्यावर व चालतांना मान वांकडी करितो, आळशी, संथ, चालतांना हात जास्त हालवितो, हांसत बोलतो, चेहरा रुंद व गोल, चाल हत्तीसारखी डुलत, स्त्रियांचीं लक्षणें विशेष, स्वर बारीक, विद्वान्, हस्तकला-कुशल, पोषाखाची काळजी न घेणारा, अशा प्रकारचें या राशीचें स्वरूप आहे.

**तुला**—चित्राचे दोन चरण, स्वाती आणि विशाखाचे तीन चरण मिळून तुला राशि होतो. चेहरा, हात, पायांच्या नळया व एकंदर शरीर फार लांबट, पायांच्या नळया बांकदार, शरीर उंच असून सडपातळ, वर्ण बहुधा काळा, स्वर लहान, हांसणें तोंड आकुंचित करून व मासलेवाईक, बोलणें जपून, नेमकें व कांटेतोल, वृत्ति सात्त्विक, बोलतांना माना उभ्या फार हालवतो, उभा असतांना व चालतांना पोंक काढल्यासारखा दिसतो, विद्वान् आणि शास्त्रज्ञ, अशा प्रकारचें या राशीचें स्वरूप आहे.

या राशींत लग्नीं रवि असतां शरीर फार उंच व काळें असतें. चंद्र असतां अवयव फार लांबट व गोरे असतात. गुरु, शुक्र व बुध हे असतां देखणा होतो.

**वृश्चिक**—विशाखाचा एक चरण, अनुराधा व ज्येष्ठा मिळून वृश्चिक

राशि होतो. कमरेच्या वरच्या भागापेक्षां खालचा भाग तोकडा व त्याचप्रमाणें कित्येक अवयवही तोकडे, उंची कमी, नाक मोठें व फुगीर, स्वभाव खोल व खुनशी, दांत सर्वच मोठे, वर्ण गोरा, तोंडाचा जबडा मोठा, अशा प्रकारचें या राशीचें स्वरूप आहे.

**धनु**—मूळ, पूर्वाषाढा आणि उत्तराषाढाचा एक चरण मिळून धनु राशि होतो. छाती पुढें करून डुलवीत चालणें, तालीमबाज, शरीराची ठेवण विशेष बांधेसूद व धिप्पाड, नाक चांपेकळीसारखें, सडसडीत असून फारच काटक, गळा व हनुवटी हे भाग रेखल्यासारखे व कोरदार, मान भरदार, दंड पिळदार व मनगटें जाड, घोड्यावर बसणारा, मारामारींत मागें न हटणारा, बोलण्यांत बळाचा गर्व विशेष, वर्ण साधारण गोरा, लढवय्या, डोळे पिंगट, अशीं या राशीचीं लक्षणें आहेत.

या राशींत मंगळ असतां प्रकृति फार उष्ण असते. मूळव्याध किंवा दुसऱ्या एकाद्या प्रकारचा रक्तविकार, अपघात किंवा दुखापती होतात. शुक्र असतां शरीर तेजस्वी व एकाद्या देवमाणसाप्रमाणें दिसतें. बुध व गुरु असतां नीटनेटकें व तेजस्वी होतें. शनि व राहु असतां काटक परंतु रोगट होतें.

**मकर**—उत्तराषाढाचे तीन चरण, श्रवण व धनिष्ठाचे दोन चरण मिळून मकर राशि होतो. कित्येक वेळां शरीर किरकोळ, मान उंटासारखी, असंबद्ध व अविचारानें बोलणारा, एकाच गोष्टींत मन गुंगून जाणारा, अंगविक्षेप हास्यास्पद, एकदम मोठ्यानें व मध्येंच फार हळू भाषण करणारा, कित्येक वेळां शरीर अति लठ्ठ, शरीराचे कित्येक अवयव वाजवीपेक्षां फार स्थूल, वातबद्ध शरीर, स्नानसंध्यादि कर्मे भक्तिपुरःसर करणारा, परमेश्वराची सगुण भक्ति करणारा, जमाखर्चाकडे लक्ष विशेष, मिशा मोठाल्या व कल्लेदार, भुंवयांना केश रांठ, दूरदूरचे प्रवास करणारा, जबडा मगरासारखा किंवा फार बारीक, शरीराच्या मानानें डोकें फार मोठें, अशा प्रकारचें या राशीचें स्वरूप आहे.

या राशींत जर मंगळ शेवटल्या ( धनिष्ठा ) भागांत असेल तर शरीर मोठें अगडबंब व अति लठ्ठ होतें, वर्ण तांबुस असतो व अंगावर अतिशय केंस असतात.

**कुंभ**—धनिष्ठाचे दोन चरण, शततारका व पूर्वाभाद्रपदाचे तीन चरण मिळून कुंभ राशि होतो. शरीर सूक्ष्म, डोक्याला बहुधा टक्कल, कपाळाचे दोन बाजूंचे भाग बरेच निमुळते, चेहरा देखणा, विद्याव्यासंगी, मोठा कल्पक, खोल व तात्त्विक विचार करणारा, कायदेपंडित अशा प्रकारचीं या राशीचीं लक्षणें आहेत.

मीन—पूर्वाभाद्रपदाचा एक चरण, उत्तराभाद्रपदा व रेवती मिळून मीन राशि होतो. शरीर फार ठेंगणें, डोकें व शरीराचे कित्येक अवयव फारच लहान, जननेंद्रिय बारीक, वर्ण साधारण गोरा अशा प्रकारचें या राशीचें लक्षण आहे.

याप्रमाणें राशींचीं सामान्य लक्षणें आहेत. एका राशीचीं सर्व लक्षणें एकाच माणसाचे ठिकाणीं आढळतील असें समजूं नये. ज्या वेळीं एकादें लक्षण स्पष्ट आढळेल त्या वेळीं त्या राशीचें निश्चयात्मक ज्ञान होईल. लग्न अमुक राशीचें व चंद्र अमुक राशीचा हें नेमकें सांगतां येणें अवघड आहे. तथापि एक कायम झाल्यावर दुसऱ्याचें ज्ञान चांगलें होईल. चेहऱ्यावरून कुंडली मांडणारे कित्येक ज्योतिषी पृच्छकास जन्मनाम विचारतात. भोळया लोकांस हें कां विचारतात तें ध्यानांत येत नाहीं, पण जन्मनाम समजतांच ज्योतिष्याला चंद्र समजतो व चंद्राचें ज्ञान झालें म्हणजे लग्नाचें सहजच होतें. कित्येक वेळां लग्नही समजत नाहीं, त्या वेळीं जादूगार ज्योतिषी पृच्छकास कुंडलींत नुसते अंकच भरावयास सांगतो व जन्मनामही विचारतो. या युक्तीनें तो लग्न व चंद्र यांचें सहजच ज्ञान करून घेतो. भोळया लोकांस यांतलें इंगित माहीत नसल्या-कारणानें ज्योतिष्यानें खरोखरच कुंडली मांडली असें वाटतें व त्यामुळें खूष होऊन मोठी दक्षणाही ते त्यांना देतात! परंतु यांत ज्योतिष्याचें तिळभरही कौशल्य नाहीं, हें ध्यानांत ठेवावें. चेहऱ्यावरून कुंडली मांडणारास लग्न व चंद्र यांचें ज्ञान झालेंच पाहिजे, तरच त्याला कुंडली मांडतां येते असें म्हणा-वयाचें. परंतु आज समाजाची अशी स्थिति आहे कीं–"**दुनिया झुकती है, लेकिन् झुकानेवाला चाहिये.**"

## ग्रहपरीक्षा

कुंडलींत ग्रह कोठेंही असले तरी ते राशिपरत्वें व स्थानपरत्वें शरीरावर परिणाम करितात. या परिणामांचें बरोबर ज्ञान झाल्यास एकाद्या वेळीं लग्नज्ञान न झालें तरी तें यांवरून होतें. म्हणून याबद्दल थोडेसे अनुभव खालीं देतों.

१ डोळे वाटोळे असून पुढें आलेले दिसतील तर सप्तमांत मंगळ आहे म्हणून समजावें.

२ कपाळदुखी, मूळव्याध, डोळे लाल, चेहऱ्यावर लाली जास्त असा योग असेल तर मंगळ लग्नांत आहे म्हणून समजावें.

३ मानेच्या भागावर तांबडा डाग, कोणत्याही कारणानें झालेल्या जखमेची निशाणी, भाजल्याच्या अगर गळवें—खांडकें यांच्या खुणा, देवींचे वण, अशा प्रकारचीं लक्षणें दिसतील तर लग्नीं अगर चंद्राजवळ मंगळ असेल. हा योग मेष राशीवर झालेला असेल तर निश्चयानें खुणा असतील.

४ डोळे पिंगट व लाल असे दिसतील तर अग्निराशींत (मेष, सिंह अगर धनु या राशींत) रवि अगर मंगळ हे ग्रह आहेत असें समजावें. डोळे फार मोठे व पुढें आलेले हें लक्षण निश्चयानें मंगळाचेंच आहे.

५ कपाळ फार पुढें दिसेल तर सिंह राशीचा मंगळ लग्नीं आहे म्हणून समजावें.

६ डोळे दुखरे असतील व विशेषेंकरून खुपऱ्यांचा विकार असेल तर मंगळ धनस्थानांत आहे म्हणून समजावें.

७ शरीराचा कोणताही भाग मोडलेला, कापलेला किंवा जळालेला असेल तर धनु राशींत मंगळ आहे असें समजावें.

८ डोळे घारे असतील तर रवि-मंगळ किंवा हर्शल-मंगळ हे नेत्रस्थानीं किंवा कुंडलींत कोठेंही एकत्र असतील.

९ नेत्र अति तेजस्वी, स्वच्छ, काळे व पाणीदार असतील तर शुक्र दुसऱ्या स्थानांत अगर नेत्रस्थानांत असेल.

१० नेत्र मळकट, अति काळे, गढूळ रंगाचे, लहान, खोल अशा प्रकारचे असतील तर लग्नीं अगर दुसऱ्या स्थानांत शनि चंद्रानें युक्त असेल.

११ शुक्राप्रमाणेंच चंद्राचेही डोळे असतात व अवलोकनशक्तीनें या दोन ग्रहांतील फरक समजतो.

१२ रवि-शनि, मंगळ-शनि किंवा हर्शल-शनि हे योग लग्नांत अगर दुसऱ्या स्थानांत असतील व ते जर कर्क, सिंह, धनु, मेष राशींचे कोठेंही असतील तर नेत्रांत हिरवटपणा फारच असतो.

१३ दांत शुभ्र, स्वच्छ व तेजस्वी हे गुण चंद्र, गुरु व शुक्र या ग्रहांत आहेत.

१४ दुसऱ्या अगर पहिल्या स्थानांत चंद्र असेल तर आर्द्रमुख असतो व ओंठावर चरबी व लाली विशेष असते.

१५ बोलतांना अडत असेल व तोंडांत जीभ अडखळत असेल तर लग्नीं अगर दुसऱ्या स्थानांत राहु असेल.

१६ दांत आंवळून अगर मुख फार न उघडतां बोलणारा असेल तर लग्नीं शनि आहे म्हणून समजावें.

१७ लिहितांना तोंडें वांकडीं करील तर दुसऱ्या स्थानांत राहूचा संभव आहे.

१८ जीभ पुढें करून बोलत असेल, रकार चांगला उच्चारतां येत नसेल, किंवा बोलण्यांत अन्य कांहीं खोडी असेल तर चंद्र हा राहूनें युक्त असेल किंवा लग्नीं राहु असेल.

१९ दंतपंक्ति धनुष्याकार व अतिशय बांकदार असेल तर लग्नीं राहु असेल.

२० शनि-चंद्र जलराशींत एकत्र असतील तर दमा, सर्दीचे विकार व वातबद्ध शरीर हे गुण आढळतील.

२१ बोलतांना खंकारतो व वारंवार खांद्याला मान घांसतो त्याचे शनि-चंद्र कुंभ राशींत एकत्र असतील.

२२ नेहमीं पडसें व बोलतांना नाकांत कांहीं अडकल्यासारखें करितो त्याचे शनि-चंद्र बहुधा मकर राशींत किंवा दुसऱ्या एकाद्या जल ( कर्क, वृश्चिक, मकर ) राशींत असतील.

२३ पोट फार मोठें दिसत असेल किंवा पोटावर बरेच केश असतील तर चतुर्थ स्थानांत चंद्र अगर गुरु यांचा संभव आहे.

२४ आम्लपित्ताचा उपद्रव असेल तर रवि-मंगळ हे मेष राशींत लग्न, चतुर्थ किंवा षष्ठ स्थानीं असतील. कोणत्या स्थानांत असावे हें त्यांच्या इतर लक्षणांवरून जाणावें.

२५ अपस्मार ( फेंपरें ) असेल तर चंद्र हा शनीनें किंवा मंगळानें युक्त असून समोर मंगळ अगर शनि असेल. किंवा ६ व्या स्थानांत चंद्र व समोर मंगळ असेल.

२६ नटणारा, निरनिराळया रंगांचे पोषाख करणारा, छानछोकी, ऐटबाज वस्तु बाळगणारा, अत्तरांचा शोकी अशा प्रकारचें लक्षण दिसेल तर लग्नीं शुक्र असण्याचा संभव आहे.

२७ तुंदिलतनु, गोरा, सत्त्वगुणी, कफप्रकृति, कपाळ भव्य, अगदीं निर्व्यसनी, गंभीर, शुभ्र पोषाख करणारा, दांत व नेत्र स्वच्छ, विद्याव्यासंगी, प्रौढ विचाराचा, हें लक्षण लग्नीं गुरूचें आहे.

२८ अंतर्गळ ( अंडवृद्धि ) हा विकार असेल तर शनि हा वृश्चिक राशींत

मंगळाच्या दृष्टींत असेल. किंवा वृश्चिक राशींत चंद्र असून तो शनि आणि मंगळ यांच्या दृष्टींत असेल.

२९ जाळ्या कातरणें, वळणदार अक्षरें लिहिणें व कोणतींही हस्तकौशल्याचीं कामें करणें हें कन्येचें स्वरूप असून या राशींत शुक्र अगर चंद्र असेल.

३० एकादा मनुष्य वकील असेल तर तो बहुधा मिथुन–कन्या, किंवा मकर-कुंभ, किंवा धनु–मीन या लग्नांवर जन्मतो. अथवा हीं लग्नें नसतील तर बुध, शनि अगर गुरु हे तरी वरील राशींतच असतात.

३१ इंजिनियर असेल तर मिथुन, तुला व कुंभ या राशींत मंगळ असेल, व त्याचें लग्न अगर चंद्र चर ( मेष, कर्क, तुला, मकर ) राशींत असेल.

३२ शिक्षकाचा धंदा करणारा असेल तर लग्न अगर चंद्र यांच्या नवमांत गुरु असेल.

३३ जंगलाकडे नोकरी करणारे गार्ड, राउंडगार्ड किंवा रेंजर ( इन्स्पेक्टर ) हे मेष लग्नीं किंवा मेषस्थ चंद्रावर जन्मतात.

३४ स्नानसंध्या, पूजा, सोंवळें यांचें विशेष बंड असेल तर मकर राशींत गुरु अगर चंद्र असेल.

३५ राजकीय संकट आलें असेल तर रवि अगर चंद्र यांचा आणि शनि किंवा हर्शल यांचा केंद्रयोग असेल, अथवा ते शनि किंवा हर्शल यांनीं युक्त असतील.

३६ सर्जन, डॉक्टर असेल तर वृश्चिक राशींत चंद्र, मंगळ अगर गुरु असेल. निदान वृश्चिक राशि लग्नांत किंवा दशमांत तरी असेल.

३७ निपुत्रिक असेल तर शनि व गुरु एका राशीवर असतील.

३८ संतति मुलींच होत नसेल किंवा फार कमी होत असेल तर पंचम-भावारंभीं सिंह, कुंभ अगर मेष राशि असेल.

३९ संतति लवकर लवकर होत असेल तर पंचमांत कर्क, मकर, वृश्चिक अगर मीन राशि असेल.

४० मुलींची प्रजा अधिक होत असेल तर लग्न, चंद्र, पंचमस्थान व गुरु हे कर्क, वृश्चिक अगर मीन या राशींत असतील.

४१ मुलें फार मरत असतील तर गुरु व मंगळ हे एका राशीवर अगदीं जवळ जवळ असतील, किंवा मंगळाच्या पूर्ण दृष्टियोगांत गुरु असेल.

४२ गर्भपात होत असतील, मुलें उपजत अगर अगदीं अल्प काळांत मरत असतील, स्त्री बाळंत होतांना अडत असेल, किंवा मूल कापून काढण्याचा

प्रसंग येत असेल तर पंचम स्थानीं व एकादश स्थानीं राहु, मंगळ व हर्शल हे ग्रह असतील.

४३ सर्व मुलगेच होत असतील तर पंचमांत पुरुषराशि असेल व गुरु-चंद्र हेही पुरुषराशींत असतील किंवा पंचम-एकादश स्थानीं पुरुषग्रहच असेल.

४४ संतति एकदां झाल्यावर पुन्हां फार वर्षांनीं मूल झालें असेल तर पंचमांत किंवा एकादशांत शनि असेल.

४५ पाठीवर पुष्कळ भावंडें असतील तर तिसऱ्या स्थानांत कर्क, मकर, वृश्चिक, मीन हे राशि असतील.

४६ पाठीवरचीं भावंडें जगत नसतील तर तिसऱ्या स्थानांत शनि असण्याचा व तो अग्नि ( मेष, सिंह, धनु ) राशींत अगर वृश्चिक राशींत असण्याचा संभव आहे.

४७ ज्येष्ठ व पाठीवरचें अशीं दोन्ही भावंडें मृत असतील अगर त्यांचे गर्भगत असतील तर तिसऱ्या स्थानांत रवि अगर मंगळ असेल.

४८ भावंडांत एकोपा नसेल किंवा त्यांचें कोणत्याही प्रकारचें सुख नसेल तर तिसऱ्या अगर नवव्या स्थानांत मंगळ असेल.

४९ एकाद्याला ऐकूं कमी येत असेल तर वायु ( मिथुन, तुला, कुंभ ) राशींत तिसऱ्या, अकराव्या अगर नवव्या स्थानांत शनि असेल.

५० कान फुटला असेल तर शनि, मंगळ व रवि हे ग्रह तिसऱ्या, अकराव्या किंवा नवव्या स्थानांत एकत्र, आलटून पालटून किंवा एकेक जण एकेका स्थानांत असा योग असण्याचा संभव आहे.

५१ जन्म झाल्यानंतर ७ वर्षांच्या आंत अगर क्वचित् पुढें केव्हांही जर कुटुंबांत एक अथवा अधिक अकस्मात् मृत्यु झाले असतील तर दुसऱ्या स्थानांत हर्शल आहे म्हणून समजावें.

५२ हर्शलचा स्वाभाविक धर्म असा आहे कीं, तो जन्मकालीं ज्या स्थानांत असतो त्या स्थानावर ज्या व्यक्तींचा विचार होतो त्या व्यक्तींत अकस्मात् मृत्यु होतो.

५३ आईबापांचे मृत्यु एकाच काळीं होतील तर चतुर्थ स्थानीं शनि-चंद्रयोग असून चतुर्थांत हर्शल असेल. सारांश, चतुर्थ-दशमांपैकीं एकाद्या स्थानांत हर्शल असलाच पाहिजे. यासंबंधानें दुसरेही कित्येक योग आहेत ते ज्योतिःशास्त्राची पुष्कळशी माहिती झाल्याशिवाय कळणार नाहींत.

५४ ज्यांना भगंदर, सर्वांगाला जखमा किंवा व्रण, गर्मी अगर दुसरे भयंकर लघवीचे विकार असतील त्यांच्या सहाव्या स्थानांत वृश्चिक राशींत शनि किंवा मंगळ असेल.

५५ लग्नांत जर भानगडी झाल्या असतील, किंवा अकस्मात् लग्न मोडलें असेल, किंवा अन्य विघ्नें आलीं असतील तर सप्तमांत हर्शल असण्याचा संभव आहे.

५६ दिगंत कीर्ति ज्याला प्राप्त होते त्याच्या नवमांत गुरु-चंद्र योग असतो.

५७ जीं माणसें आपल्यामागें आपलें नांव ठेवितात त्यांच्या नवमांत अगर चंद्राच्या नवमांत शनि, गुरु, रवि व हर्शल या मोठ्या गोलांतील एकादा गोल तरी बलवान् असतोच.

५८ साधारणतः श्रीमंत माणसांचे पुष्कळसे ग्रह उदित ( सप्तमापासून लग्नापर्यंत ) अर्धांत असतात, किंवा धनभागांत ( नवमापासून तिसऱ्या स्थानाच्या आरंभापर्यंत ) पुष्कळ ग्रह असतात.

५९ पैसा कितीही मिळाला तरी हातांत टिकत नाहीं, उधळपट्टी होते, विनाकारण खर्च होतो, कर्ज होतें वगैरे गोष्टी संपत्तीसंबंधानें घडतात. याचें कारण लग्नाच्या अगर चंद्राच्या दुसऱ्या स्थानांत मंगळ असण्याचा संभव असतो. वाजवी रीतीनें खर्च करूनही पैसा पुरत नसेल व कर्ज काढावें लागत असेल तर लग्नाच्या अगर चंद्राच्या द्वादश स्थानांत मंगळ असेल.

६० कुटुंब मोठें असेल किंवा पुष्कळ माणसांचें उपजीवन स्वतःवर अवलंबून असेल तर दुसऱ्या स्थानांत गुरु असण्याचा संभव असतो.

६१ कुटुंबांत कलह असतील तर दुसऱ्या स्थानांत रवि असण्याचा संभव आहे.

६२ वडिलार्जित इस्टेटीसंबंधानें तंटे लागले असतील तर दुसऱ्या स्थानांत मकर राशीचा रवि असूं शकेल.

६३ वाहनांचा शोक असेल तर चतुर्थ स्थानीं गुरु अगर शुक्र असण्याचा संभव आहे.

६४ नाक, तोंड, दांत, घसा यांपैकीं एकाद्या अवयवांतून रक्त जाण्याचा विकार असेल तर ( सायन ) मेष राशीच्या २६ अंशांपुढें लग्न असेल.

६५ स्त्री अति सुंदर व गोरी असेल तर सप्तमांत अगर लग्नीं शुक्र असेल, अथवा गुरु असेल, अथवा क्वचित् चंद्रही असेल.

६६ स्त्री तांबुस वर्णाची, सडसडीत बांध्याची व अति तापट असेल तर सप्तमांत अगर दुसऱ्या स्थानांत मंगळ असेल.

६७ मुलें सुस्वरूप असतील तर पांचव्या अगर अकराव्या स्थानांत शुक्र असेल.

६८ मुलें रोगट होतील तर पांचव्या स्थानांत शनि अगर मंगळ असेल.

६९ पुराण सांगणारा शास्त्री किंवा वैय्याकरणी असेल तर मिथुन राशींत लग्न अगर चंद्र असेल.

७० स्त्री उठून गेली असेल किंवा कोणत्याही कारणानें तिच्यांत बेबनाव असेल तर सप्तम स्थानांत हर्शेल असेल.

७१ एकाद्या मनुष्याला दत्तकयोग ( मांडीवर बसण्याचा योग ) घडला असेल तर पुढील योगांपैकीं एकादा योग निश्चयानें असेल.

( १ ) कर्क किंवा सिंह राशींत पापग्रह.
( २ ) चंद्र किंवा रवि हे पापग्रहानें युक्त अथवा दृष्ट.
( ३ ) चतुर्थ अगर दशमांत पापग्रह.
( ४ ) मेष, सिंह, धनु किंवा मकर यांपैकीं एकादी राशि चतुर्थ अगर दशमस्थ.
( ५ ) चंद्राच्या चतुर्थ स्थानीं पापग्रह.
( ६ ) रवीच्या दशमांत अगर नवमांत पापग्रह.
( ७ ) चंद्र अगर रवि हे शत्रुक्षेत्रीं शत्रुग्रहानें युक्त.

७२ जुळीं मुलें बहुधा एका लग्नावर व एकाच राशीवर जन्म पावतात. त्यांच्या लग्नीं राहु असतो व हा राहु कन्या, मीन, मिथुन किंवा धनु राशींत असतो. मीन व मिथुन हे राशिचक्रांत जुळे राशि आहेत. त्यामुळें जुळया, मुलांच्या कुंडल्यांत या राशींत लग्न, चंद्र, राहु किंवा शुक्र अथवा लग्नस्वामी असतो असें आढळण्यांत येतें. कन्या आणि धनु हे अनुक्रमें मीन आणि मिथुन या राशींचे सप्तमराशि असल्यामुळें वरील लग्नादि या राशींतही आढळतात.

अशा प्रकारचे अनंत योग आहेत, ते या छोट्याशा पुस्तकांत देतां येणें शक्य नाहीं, परंतु दिग्दर्शनार्थ बऱ्याच प्रसंगीं आढळणारे सामान्य योग येथें देणें जरूरीचें वाटलें. दुसरें असें कीं, एकाच प्रकारची गोष्ट घडवून आणणारे अनेक प्रकारचे योग असतात, त्यामुळें अमुकच एक योग असेल असें निश्चयात्मक

सांगणें फार अवघड असतें, किंबहुना सांगतांच येणार नाहीं असें म्हटलें तरी चालेल, म्हणून तसले योग येथें दिले नाहींत. मुद्राज्योतिषाचा अभ्यास करणारांना या योगांची व योगतत्त्वांची जशी विस्तृत माहिती असेल तशी तो बिनचूक कुंडली मांडील.

वर जे कित्येक योग दिले आहेत ते शारीरलक्षणांवरून कळणारे नाहींत. ज्या मनुष्याची कुंडली करावयाची त्याची माहिती मिळेल तर त्या योगांचा उपयोग होईल. आमच्या मतें कुंडली तयार करणारानें सर्व बाजूंनीं विचार केला पाहिजे. केवळ शारीरलक्षणांवरच जोर देऊन चालणार नाहीं. लोकांस कौतुक दाखवून पैसे उकलणें व खरोखरच एकाद्याची कुंडली बनवणें यांत महदंतर आहे.

रोगाची चिकित्सा जशी तीन ( दर्शन, स्पर्श व प्रश्न ) प्रकारांनीं करावी असें वाग्भटांत सांगितलें आहे, तशीच मनुष्याच्या कुंडलीची परीक्षा तीन प्रकारांनीं करावी असें आमचें मत आहे. ते तीन प्रकार असे—

**१ ला–शारीरलक्षणांवरून.**

**२ रा–आयुष्यांत घडलेल्या हकीगतींवरून.**

**३ रा–नातलगांच्या शारीरलक्षणांवरून किंवा कुंडल्यांवरून.**

यांपैकीं दोन प्रकारांचें येथपर्यंत दिग्दर्शन केलें. आतां तिसऱ्या प्रकाराविषयीं सांगतों.

## नातलगांच्या कुंडल्या

### मूल आणि आईबाप

मुलें आणि आईबाप यांच्या कुंडल्या जर पुढें धरल्या तर आपणांस खालीं लिहिलेले प्रकार आढळून येतात—

१ राशि ( चंद्र ) एक.

२ लग्न एक.

३ एकाची राशि तें दुसऱ्याचें लग्न.

४ रवि एक.

५ एकाचा रवि तें दुसऱ्याचें लग्न किंवा चंद्र.

६ आईबापांच्या नवम-पंचमस्थ राशींत मुलाचें लग्न किंवा चंद्र.

७ बापाच्या रवीच्या राशीला मुलाचा गुरु.

८ बापाच्या सप्तमांत राहु असेल तर मुलाच्या लग्नीं असतो.

९ एकाद्या कुटुंबांत एकाच ग्रहाचें प्राबल्य असतें, त्यामुळें तो ग्रह बहुते-कांच्या कुंडल्यांत एकाच स्थानांत किंवा एकाच राशींत आढळतो.

१० जसा लग्न-सप्तमांतला राहु दुसऱ्या कुंडलींत उलट स्थितींत असतो, तसाच चतुर्थ-दशमांतलाही असतो. क्वचित् इतरत्र असाच प्रकार आढळतो.

यात्रमाणें मूल अणि आईबाप यांच्या कुंडल्यांत साम्य आढळतें. ज्याची कुंडली मांडावयाची, त्याच्या वळणाचें जें मनुष्य असेल त्या मनुष्याची कुंडली विशेष उपयोगी पडेल. मूल आईच्या वळणाचें असेल तर त्याची कुंडली तयार करण्याच्या कामीं बापाची कुंडली तादृश उपयोगी पडणार नाहीं. पण जो गुण ( शरीराचा अथवा इतर ) बापांत आहे तोच जर एकाद्या मुलांत असेल तर तो गुण ज्या ग्रहानें उत्पन्न झाला तो ग्रह मुलाच्या कुंडलींत ज्या राशीचा किंवा ज्या स्थानचा असेल त्या राशींत किंवा त्या स्थानांत तोच बापाच्याही कुंडलींत असेल. याप्रमाणें मुलें व आईबाप यांपैकीं एकाद्याची कुंडली तयार करावयाची असतां इतरांच्या कुंडल्यांची आवश्यकता आहे असें दिसून येईल.

## भावंडें

भावंडांच्या ( भाऊ व वहिणी यांच्या ) कुंडल्या पुढें धरिल्यास खालील नियम दृष्टीस पडतात—

१ राशि एक.

२ लग्न एक.

३ एकाची राशि तें दुसऱ्याचें लग्न.

४ मंगळ एक.

५ तृतीय स्थानचा एकाचा राशि तें दुसऱ्याचें लग्न अथवा चंद्र, क्वचित् मंगळ. ( हें तृतीय स्थान लग्न, चंद्र व मंगळ या तिहींवरून पाहिलें पाहिजे. )

## पतिपत्नी

नवरा आणि त्याची बायको ( अथवा त्याच्या अनेक बायका ) यांच्या कुंडल्या पुढें धरिल्या तर खालील प्रकार दृष्टीस पडतात—

१ लग्न व राशि एक.

२ रवि व चंद्र एक.

३ एकाची राशि तें दुसऱ्याचें लग्न.

४ एकाचा रवि तो दुसऱ्याचा चंद्र.

५ शुक्र एक.

६ एकाचा शुक्र तें दुसऱ्याचें लग्न किंवा राशि.

७ एकाचें लग्न, राशि, रवि, चंद्र व शुक्र यांचें सप्तम स्थान व दुसऱ्याचे लग्नादि वरील राशि एकच.

८ एकाचें कुटुंब ( २ रें ) स्थान तें दुसऱ्याचें लग्न, सप्तम किंवा चंद्र, शुक्र.

९ लग्नेश, कुटुंबेश, सप्तमेश, चंद्रेश व शुक्रेश यांच्यांत एकत्वाचें साम्य.

याशिवाय स्त्रीच्या सौंदर्यावरून व तिच्या गुणांवरून पतीच्या कुंडलींत कोणता ग्रह कोठें असेल याची कल्पना अभ्यासानें करितां येते व त्याचप्रमाणें पतीच्या लक्षणांवरून स्त्रीच्या ग्रहांचीही कल्पना होते.

याप्रमाणें नातलगांच्या कुंडल्यांचा शारीरलक्षणांवरून कुंडली तयार करण्याच्या कामीं उपयोग करावा.

वरील सर्व माहिती, कुंडली खरी आहे, किंवा खोटी असेल तर खरी कशी असली पाहिजे, याचा सूक्ष्म विचार करण्याच्या कामीं फार उपयोगी पडेल अशी खात्री आहे. जेव्हां लग्नांत घोंटाळा असतो, तेव्हां कोणता ग्रह कोणत्या स्थानांत बसला पाहिजे व तो कां हें या माहितीवरून चांगलें कळेल.

कित्येक ज्योतिषी एकाद्याच्या कुंडलीवरून त्याचें जें वर्णन करितात, तें कित्येक प्रसंगीं जुळत नाहीं, तेव्हां कुंडली चुकीची असावी असा शेरा ठोकून देतात. पण हें त्यांचें करणें गैरशिस्त आहे. कारण ते आपणांत सर्वज्ञतेचा गुण आहे असें गृहीत धरतात. कुंडली बरोबर असली तरी सुद्धां मी मी म्हणवणाऱ्या ज्योतिष्यास बिनचूक फलादेश मिळवून देतां येत नाहीं असा सर्वांस अनुभव आहे, तर वर्णन जुळत नाहीं म्हणून कुंडलीच चूक असली पाहिजे असा शेरा देणें वेडेपणाचें नव्हे काय? यांत ज्योतिषी आपलें अज्ञान झांकण्याचा मात्र प्रयत्न करितो, यापेक्षां विशेष अर्थ नाहीं. कुंडली बरोबर आहे किंवा चूक आहे हें ज्योतिष्यानें मागें सांगितल्याप्रमाणें तीन प्रकारांनीं सिद्ध केलें पाहिजे व पृच्छकानें करून घेतलें पाहिजे. तशी परीक्षा केली नसेल तर ज्योतिषी आणि पृच्छक दोघेही भोळे आहेत असें निरुपायानें म्हणावें लागतें !

## नष्टजातक

बृहज्जातकादि ग्रंथांत गर्भकाल किंवा जन्मकाल माहीत नसल्यास त्या मनुष्याची कुंडली कशी तयार करावी याविषयीं निरनिराळ्या रीति दिल्या आहेत,

त्यांचा प्रसंगानुरूप उपयोग करावा. एकाद्याची कुंडली असून ती सांगावयाच्या कामींही या प्रकरणाचें साह्य घेतां येण्यासारखें आहे. म्हणून त्यांतील मुख्य प्रकार येथें क्रमानें सांगतों.

१ **शकज्ञान**–प्रथमतः वयाचें अनुमान करावें, किंवा प्रश्नकर्त्यास वय विचारावें. वय समजलें म्हणजे तितकें चालू शकांत वजा करावें, म्हणजे सुमाराचा जन्मशक कळेल. त्या शकांत गुरु कोणत्या राशीवर आहे हें पंचांगांच्या टिपणावरून सहज कळेल. आपण जें गुरूचें अनुमान केलें असेल तें प्रश्नलग्नावरून कायम करावें. त्याची रीति अशी – "प्रश्नलग्नाची द्रेष्काण कुंडली मांडून तिच्या लग्नीं, पंचमांत अगर नवमांत जो राशि असेल त्या राशीस गुरु जाणावा."

२ **अयनज्ञान**–प्रश्नलग्न पहिल्या होऱ्यांत असतां उत्तरायण व दुसऱ्या होऱ्यांत असतां दक्षिणायन. एका राशीचे दोन भाग केले म्हणजे प्रत्येक भाग १५ अंशांचा होतो, त्यास होरा म्हणतात.

३ **ऋतुज्ञान**–लग्नीं कोणी ग्रह असल्यास त्याच्या ऋतूंत जन्म सांगावा. अनेक ग्रह असल्यास त्यांत जो बलवान् असेल त्याच्या ऋतूंत जन्म सांगावा. लग्नीं रवि असल्यास ग्रीष्म ऋतु जाणावा. ग्रहांचे ऋतु येणेंप्रमाणें आहेत— चंद्र–वर्षा, मंगळ–ग्रीष्म, बुध–शरत्, गुरु–हेमंत, शुक्र–वसंत व शनि–शिशिर. जेव्हां लग्नीं कोणीही ग्रह नसेल तेव्हां प्रश्नलग्न ज्या द्रेष्काणांत बसत असेल त्या द्रेष्काणस्वामीचा ऋतु घ्यावा.

आपण प्रथमतः अयन सिद्ध केलें असेल त्यांत वरील रीतीनें ऋतु येत नसेल तेव्हां वर्षा, शरत् व हेमंत त्यांच्या जागीं अनुक्रमें वसंत, ग्रीष्म व शिशिर हे ऋतु कल्पावे.

४ **मासज्ञान**–लग्नाचा द्रेष्काण जो येत असेल तो आपल्या पूर्वार्धांत असेल तर आलेल्या ऋतूचा पहिला मास घ्यावा. दुसऱ्या अर्धांत असेल तर दुसरा मास घ्यावा.

५ **तिथिज्ञान**–प्रश्नकालीं स्पष्ट सूर्य असेल त्याच्या अंशांइतकी तिथि घ्यावी.

६ **दिवा-रात्रिज्ञान**–प्रश्नलग्न दिवाबली असल्यास रात्रीं व रात्रिबली असल्यास दिवसास जन्म कल्पावा. मेष, वृषभ, मिथुन, कर्क, धनु व मकर हे रात्रिबली आहेत. सिंह, कन्या, तुला, वृश्चिक व कुंभ हे दिवाबली आहेत. मीन संध्याबली आहे.

**७ जन्मकालज्ञान**–प्रश्नलग्नाच्या गतपळांनीं दिवसा जन्म असल्यास दिनमानानें व रात्रीं जन्म असल्यास रात्रिमानानें गुणून स्वदेशीय तत्कालीन लग्नोदयपळांनीं भागावें. भागाकार येईल तितकीं घटीपळें घ्यावीं.

याप्रमाणें प्रश्नलग्नावरून जन्मकालाची कुंडली तयार करावी, असें पूर्वशास्त्रकारांनीं सांगितलें आहे, याशिवाय आणखीही निरनिराळ्या रीति सांगितल्या आहेत. त्या येथें देण्याचें प्रयोजन नाहीं. कारण सर्व रीतींची एकाच कालीं योजना केल्यानें घोंटाळा होईल. वाचकांची इच्छा असल्यास त्यांनीं बृहज्जातकाचें मराठी भाषांतर झालेलें आहे, तें पुस्तक आणवावें व माहिती करून घ्यावी. तथापि त्यांतील लग्न व चंद्र सांगण्याचा जो गंमतीचा एक प्रकार आहे तो सांगतों:—

**लग्नसाधन**–प्रश्नलग्नकुंडली मांडून झाल्यानंतर प्रश्नकर्ता बसला असेल तर सप्तम, निजला असेल तर चतुर्थ, उभा असेल तर दशम व उठत असेल तर प्रथम स्थानीं जो राशि असेल तें लग्न घ्यावें.

दुसरी रीति–प्रश्नलग्नाच्या द्रेष्काणापासून सूर्य जितक्या द्रेष्काणावर असेल तितकी संख्या लग्नराशीची घ्यावी. संख्या १२ पेक्षां ज्यास्त झाल्यास बारांनीं भागून बाकी उरेल ती संख्या घ्यावी. किंवा प्रश्नलग्नाचा जो नवमांश तेंच लग्न घ्यावें.

वरील दोन रीतींची योजना कोणत्या प्रसंगीं करावयाची हें ज्याचें त्यानें अनुभवानें ठरवावें.

**चंद्रसाधन**–लग्नापासून जितक्या अंतरावर प्रश्नकालचा चंद्र असेल तितकी संख्या चंद्राची घ्यावी. जन्मलग्न मीन असल्यास मीन राशीचाच चंद्र घ्यावा.

दुसरी रीति–पृच्छक शरीराच्या ज्या भागास स्पर्श करील तो भाग ज्या राशीचा दर्शक असेल त्या राशींत चंद्र कल्पावा. मस्तक–मेष, मुख–वृषभ, ऊर–मिथुन, हृदय–कर्क, पोट–सिंह, कमर–कन्या, बस्ती ( ओटीपोट )–तूळ, लिंगगुद–वृश्चिक, मांड्या–धनु, गुडघे–मकर, पोटऱ्या–कुंभ, पावलें–मीन.

याप्रमाणें नष्टजातकाचा प्रकार आहे. कुंडली मांडणारास लग्न, चंद्र, रवि यांची कल्पना येण्यास हा प्रकार सोयीचा आहे.

# ऐच्छिक कुंडली

ह्या विषय फारच गंमतीचा आहे. एकाद्या मनुष्यास एकदम सांगावें कीं, "कांहींएक विचार न करितां तुझ्या मनास येईल तशी कुंडली मांड." हें काम अति त्वरेनें झालें पाहिजे. तें जितक्या त्वरेनें होईल तितकें जास्त विश्वसनीय जाणावें. ज्या मनुष्याची आपणांस कुंडली सांगावयाची असेल त्याला याप्रमाणें ऐच्छिक कुंडली मांडावयास सांगावी, व त्या कुंडलीवरून लग्न-चंद्रादिकांचें ज्ञान करून घ्यावें. अनेक वेळां या कुंडलीचा प्रयोग करून पुढील गोष्टी अनुभवास आल्या आहेत.

१ आपलें स्वतःचें जें लग्न असेल तेंच मांडतो किंवा त्याचा सप्तम राशि लग्नीं मांडतो.

२ चंद्र स्वतःचाच मांडतो किंवा खऱ्या चंद्राच्या सप्तमांत मांडतो.

३ रवि स्वतःचाच मांडतो किंवा आपल्या खऱ्या रवीच्या सप्तमांत मांडतो.

४ एकाद्या वेळीं चंद्राच्या किंवा सप्तमाच्या राशीला लग्न मांडतो व लग्नाच्या किंवा त्याच्या सप्तमाच्या राशीला चंद्र मांडतो.

५ क्वचित् रविसप्तम लग्न असतें.

६ आपल्या खऱ्या गुरूच्या सप्तमांत रवि मांडतो किंवा खऱ्या रवीच्या सप्तमांत गुरु मांडतो.

म्हणून ही ऐच्छिक कुंडली फार महत्त्वाची आहे. हींत दुसरेही कित्येक चमत्कार दृष्टीस पडतात, ते अभ्यासानें ध्यानांत येतील. मात्र ही अत्यंत गुप्त विद्या आहे, तिचा फारसा स्फोट करूं नये. कारण, प्रश्नकर्त्याला जर हें कळलें तर तो आपणांस हवी तशी ऐच्छिक कुंडली मांडणार नाहीं. ऐच्छिक कुंडली मांडून घेतांना आपलें व पृच्छकाचें मन निर्विकल्प असलें पाहिजे व आपणांस चंद्र यशदायक स्थितींत असला पाहिजे. चंचल वेळीं व आपलें चित्त चंचल असतां किंवा त्रासलेलें असतां ऐच्छिक कुंडलीचा प्रयोग करूं नये.

याप्रमाणें मुद्राज्योतिषाचा सांगोपांग विचार केला आहे. अभ्यासी मनुष्य नेटानें व्यासंग करील तर तो या विद्येंत नामांकित निष्णात होईल अशी खात्री आहे. वरवर पुस्तक वाचून कांहीं फायदा होणार नाहीं. प्रत्येक विषय नीट समजून घेतला पाहिजे, व नंतर त्याचा सूक्ष्म दृष्टीनें अनुभव घेतला पाहिजे.

समाप्त.

# मुद्राज्योतिष

## परिशिष्ट १

## अंधकुंडली मांडण्याचें साधन

### शनि, गुरु व राहु हे एकत्र व समोरासमोर आल्याचे काळ.

**शके १७७१ पासून शके १८७० अखेर.**

**महिना, राशि व अंश यांसहित.**

### (१) शनि+गुरु एकत्र.

| | | | |
|---|---|---|---|
| १७८३ | आश्विन–कन्या | १ | अंश. |
| | फाल्गुन– ,, | ० | ,, |
| १७८४ | वैशाख–सिंह | २८ | ,, |
| १८०३ | चैत्र–मेष | ८ | ,, |
| १८२३ | वैशाख–धनु | २२ | ,, |
| १८४३ | भाद्रपद–कन्या | ७ | ,, |
| १८६२ | आषाढ–मेष | १९ | ,, |
| | कार्तिक–मेष | १५ | ,, |
| | पौष–मेष | १४ | ,, |

### (२) शनि–गुरु समोरासमोर.

| | | | |
|---|---|---|---|
| १७७२ | आश्विन–मीन* | २३ | अंश. |
| १७७४ | आषाढ–मेष | २४ | ,, |
| | श्रावण–मेष | २६ | ,, |
| १७९२ | कार्तिक–धनु | ३ | ,, |
| १७९३ | ज्येष्ठ– ,, | १४ | ,, |
| १८१३ | चैत्र–सिंह | २१ | ,, |
| | आषाढ–सिंह | २५ | ,, |
| १८१४ | मार्गशीर्ष–कन्या | २२ | ,, |
| १८३२ | कार्तिक–मेष | ९ | ,, |
| १८३३ | वैशाख–मेष | १८ | ,, |
| | आश्विन–मेष | २६ | ,, |
| १८५२ | आषाढ–धनु | १२ | ,, |
| | माघ–धनु | २२ | ,, |
| १८५३ | ज्येष्ठ–धनु | २७ | ,, |

(* यांत दिलेले राशि-अंश शनीचे आहेत. तेथून ६ राशि अंतरावर गुरु समजावा.)

यावरून शनि आणि गुरु हे ग्रह सुमारें २० वर्षांनीं एकत्र किंवा समोरासमोर येतात हें ध्यानांत येईल. पहिला एक शक पाठ असला म्हणजे पुढील शक सहज ध्यानांत येतील. अथवा हे सर्व शक पाठ होण्यासारखे आहेत.

### ( ३ ) शनि+राहु एकत्र.

| | | | |
|---|---|---|---|
| १७७६ | चैत्र-वृषभ | १० | अंश. |
| १७८६ | फाल्गुन-तूळ | १० | ,, |
| १७८७ | चैत्र- ,, | ८ | ,, |
| | आषाढ- ,, | ४ | ,, |
| १७९८ | फाल्गुन-कुंभ | १७ | ,, |
| १८१० | चैत्र-कर्क | १२ | ,, |
| १८२१ | कार्तिक-वृश्चिक | २९ | ,, |
| १८३३ | वैशाख-मेष | १७ | ,, |
| १८४४ | ज्येष्ठ-कन्या | ११ | ,, |
| १८५५ | फाल्गुन-मकर | २५ | ,, |
| १८६७ | वैशाख-मिथुन | १७ | ,, |

### ( ४ ) शनि-राहु समोरासमोर.

| | | | |
|---|---|---|---|
| १७८१ | श्रावण-कर्क† | २७ | अंश. |
| १७९२ | फाल्गुन-धनु | १५ | ,, |
| १८०४ | अ. श्रावण-वृषभ | ३ | ,, |
| १८१५ | भाद्रपद-कन्या | २६ | ,, |
| १८२७ | ज्येष्ठ- कुंभ | १० | ,, |
| | आषाढ- ,, | ८ | ,, |
| | कार्तिक- ,, | ३ | ,, |
| १८३८ | श्रावण-कर्क | ४ | ,, |
| १८४९ | माघ-वृश्चिक | २३ | ,, |
| १८६१ | पौष-मेष | १ | ,, |

( †यांतील राशि-अंश शनीचे आहेत. )

यावरून शनि-राहु सुमारें ११ वर्षांनीं एकत्र किंवा समोरासमोर येतात.

### ( ५ ) गुरु+राहु एकत्र.

| | | | |
|---|---|---|---|
| १७७१ | श्रावण-सिंह | ११ | अंश. |
| १७७८ | माघ-मीन | १६ | ,, |
| १७८५ | पौष-वृश्चिक | ३ | ,, |
| १७९३ | वैशाख-मिथुन | ८ | ,, |
| १८०० | मार्गशीर्ष-मकर | १५ | ,, |
| १८०७ | भाद्रपद-कन्या | २ | ,, |
| १८१४ | फाल्गुन-मेष | ८ | ,, |
| १८२२ | भाद्रपद-वृश्चिक | १३ | ,, |
| १८२९ | आषाढ-कर्क | २ | ,, |
| १८३६ | माघ-कुंभ | ५ | ,, |
| १८४३ | मार्गशीर्ष-कन्या | २२ | ,, |
| १८५१ | चैत्र-मेष | २८ | ,, |
| १८५८ | आश्विन-धनु | ३ | ,, |
| १८६५ | भाद्रपद-कर्क | २१ | ,, |

( यावरून गुरु व राहु हे सुमारें ७ वर्षांनीं एकत्र व समोरासमोर येतात )

### ( ६ ) गुरु-राहु समोरासमोर.

| | | | |
|---|---|---|---|
| १७७४ | माघ-धनु* | २ | अंश. |
| १७७५ | ज्येष्ठ-वृश्चिक | २६ | ,, |
| | आषाढ- ,, | २५ | ,, |
| १७८२ | आषाढ-कर्क | १० | ,, |
| १७८९ | पौष-कुंभ | १५ | ,, |
| १७९६ | कार्तिक-तूळ | २ | ,, |
| १८०४ | वैशाख-वृषभ | १० | ,, |
| १८११ | आश्विन-धनु | १३ | ,, |
| १८१८ | श्रावण-सिंह | २ | ,, |
| १८२५ | फाल्गुन-मीन | ८ | ,, |
| १८३२ | पौष-तूळ | २२ | ,, |
| १८४० | वैशाख-मिथुन | ० | ,, |
| १८४७ | पौष-मकर | ४ | ,, |
| १८५४ | आश्विन-सिंह | २२ | ,, |
| १८६१ | फाल्गुन-मीन | २७ | ,, |
| १८६९ | भाद्रपद-वृश्चिक | २ | ,, |

( * यांतील राशि-अंश गुरूचे आहेत. तेथून ६ राशि अंतरावर राहु समजावा. )

